# अर्वाचीन मराठी वाङ्मय.

## मध्यकाल.

पूर्वार्ध, ( १८५७-१८८५ )

संपादक आणि प्रकाशक.
गणेश रंगनाथ दंडवते,
लायब्ररियन, सेंट्रल लायब्ररी,

बडोदें.

१९२४.

किंमत १० आणे.

# प्रस्तावना.



येथील सेंट्रल लायब्ररीचे रा. दंडवते यांच्या एका अधिक विस्तृत प्रमाणावर अंगीकारिलेल्या प्रयत्नाचा अंश म्हणून हें लहानसें पुस्तक वाचकांस व प्रौढ विद्यार्थिवर्गास सादर करतांना मला आनंद वाटत आहे. ग्रंथकर्त्याचा उद्देश मराठी गद्य वाङ्मयाचा प्रथमपासून आजतागायत इतिहास लिहिण्याचा असून त्यांनी येथील सद्विचार त्रैमासिकाच्या आगस्ट १९२४ च्या अंकांत स. १८०५ ते १८६० या कालांतील वाङ्मयाचें अंशतः विवेचन केलें आहे. असें असतां त्यानें १८५७ ते १८८५ पर्यंतचा मधलाच भाग प्रथम कां प्रसिद्ध केला, अशी शंका येणें जरूर आहे. त्याचें उत्तर एवढेंच कीं, कांहीं व्यावहारिक दृष्टि मनात धरून त्यानें हा मधलाच भाग प्रथम प्रसिद्ध केला आहे, कारण हा काळ सन १९२५ च्या बी. ए. च्या परिक्षेस नेमिला आहे.

आतांपर्यंत गद्य वाङ्मयाचें विवेचन करणारीं दोनच पुस्तकें झालीं आहेत एक रा. रामभाऊ जोशांचें वाङ्मय विवेचन व दुसरें प्रो पोतदारांचा इंग्रजी गद्याचा मराठी अवतार. यांपैकीं दुसरें विस्तृत व मनोहर झालें आहे. तथापि त्यांत माहितीची भर टाकण्यास वाव आहे. वरील दोन्ही पुस्तकांत १८१८ ते १८७० पर्यंतचा गद्येतिहास आहे. या पुस्तकाच्या प्रस्तुत भागांस वेंडाच्या काळापासून चिपळूणकराच्या मृत्यूपर्यंतच्या काळापर्यंतच्या मर्यादा घातल्या आहेत.

१८५७ सालीं आपल्या वाङ्मयाची स्थिति शोचनीय होती हें तर प्रसिद्धच आहे. जुन्या अभिजात कवींचा पौराणिक कथांचा काव्याकूट थांबला होता, मराठ्यांचे पराक्रम थांबल्यानें शाहिरांचीं डफतुणतुणीं बंद पडूं लागलीं, व इंग्रजी शिक्षणाचा फैलाव फारसा झालेला नसल्यानें इंग्रजी वळणाचें वाङ्मय मोठ्या प्रमाणावर अजून निर्माण होऊं लागलें नव्हतें. तथापि प्रत्यक्ष वाङ्मय निर्मिती इतकीच महत्त्वाचीं कांहीं कार्यें या काळपर्यंत होऊन गेलीं व तीं म्हणजे मराठी कोश, व्याकरण व टाइप हीं होत. त्याचप्रमाणें नियतकालिकांचा प्रचार याच काळांत प्रथम सुरू झाला.

सन १८५७ पर्यंत नांवाजण्या सारखा मराठी गद्य ग्रंथ बिलकूल झाला नाहीं म्हटलें तरी चालेल. गद्यलेखनाची कला आम्हीं इंग्रजांपासून उचलली व अद्याप

तीत आमच्या गुरूंच्या दहाव्या हिश्शानेंही आम्ही प्रवीण झालों नाहीं प्र
प्रथम आमचा काळ निरनिराळ्या पाश्चात्त्य शास्त्रांचीं मूलतत्त्वें शिकण्यांतच जावा
हे साहजिक आहे. इंग्रजी अमदानी सुरू झाल्यापासून वाङ्मयाच्या काळांत बालो-
पयोगी वाङ्मयोत्पत्तींत दिवस खर्च झाले, प्रो. पोतदारांस ही गोष्ट आम्हास लनि-
रवाणी झाली, असें वाटतें. ( त्यांचा ' अवतार–उपो. पा ५ पहा ) पण मला
तसें वाटत नाहीं. नूतन विचार, नूतन ज्ञान, नूतन मनोभावना व नूतन संस्कार
यांच्या योगे आमच्या समाजाचा हा पुनर्जन्म झालेला आहे व या जन्माच्या
बाल्यावस्थेंत प्रौढ सारस्वत निर्माण होणे कठीण होतें. असो.

वरील विवेचनावरून स. १८५७ ते १८८५ या काळाचें महत्त्व सहज लक्षांत
येईल. रा. देवधर यांच्या पुस्तकाच्या या भागांतील उणिवाची त्यांस जाणीव असून
त्या ते पुढील भागात भरून काढितील असें वाचकांस आश्वासन देऊन ही प्रस्ता-
वना पुरी करितो.

बडोदा कॉलेज.
ता. ६-१२-२४.

चिंतामण विनायक जोशी.

# अर्वाचीन मराठी वाङ्मय.

( सन १८५७–१८८५ )

अर्वाचीन मराठी वाङ्मयास तरुण बनविण्याचें श्रेय व्यक्तीकडे नसून तें अर्वाचीन शिक्षणाकडे जातें. ज्या दिवशीं या शिक्षणाची मुहुर्तमेढ रोवली तो दिवस व ज्यानें ती रोवली ती व्यक्ति अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत सस्मरणीय आहे. ही भाग्यवान् व्यक्ति एल्फिन्स्टन साहेब होय. सन १८१८ सालीं एल्फिन्स्टन साहेबांच्या कारकिर्दीत महाराष्ट्राच्या आचार–स्वातंत्र्याचा लोप होऊन याच साहेबांच्या कारकिर्दीत पुढें सन १८२२ सालीं महाराष्ट्राच्या विचार–स्वातंत्र्याचा पाया पडावयाचा होता. पहिल्या गोष्टीमुळें आपणास हळहळावें लागल्यास दुसरीच्या देणगीनें एल्फिन्स्टन साहेबानें आपणास उपकृत करून ठेवलें आहे ही गोष्ट महाराष्ट्रास विसरणें केव्हांही शक्य नाहीं. नव्हे–याच विचारस्वातंत्र्याचे बळावर आमचें गेलेले आचार स्वातंत्र्य आम्हांस फिरून मिळविण्यासारखें करण्याची श्रेष्ठ अपेक्षा यानें ठेवली होती, ही गोष्ट साहेब मजकुरास खरोखरीच भूषणावह आहे.* आणि सन १८२२ तील ही त्याची अपेक्षा सन १९२२ सालीं थोडीबहुत सिद्धीस गेलेली पाहून एलफिन्स्टनचें अनुमान बरेंच बिनचूक होतें हे प्रत्ययास येऊन आनंद वाटतो! असो.

---

* लेफ्टनंट ब्रिग्ज हे एकदां मौंट स्टुअर्ट एलफिन्स्टनच्या भेटीस गेले असतां जवळच नवीन छापलेलीं मराठी पुस्तकें पडलीं होतीं. तीं पाहून ब्रिग्ज यानें विचारलें कीं ' ही पुस्तकें कशाला "? त्यावर एलफिन्स्टन साहेबानें उत्तर केलें कीं " मराठे लोकांना सुशिक्षित करण्याला. पण लक्षांत ठेवा कीं हें सुशिक्षण म्हणजेच आम्ही आपलें चंबूगवाळें आंवरून परत युरोपांत जाण्याचा राजमार्ग ठरणार ! "

न. चिं केळकरकृत लो टिळक यांचे चरित्र पृ. ६१.

परंतु आपल्या मराठी वाङ्मयानें नुस्तें जन्मास येणें पुरेसे नव्हतें व तसेंच त्याच्या बाल्यकौमार्यावस्थेनेंही ते प्रसंशापात्र होणे शक्य नव्हते. मराठी अक्षरांचे ठसे तयार झाले व त्यांच्या साह्यानें दहावीस ग्रंथकारांचीं शंभर दोनशे मराठी पुस्तकें छापून निघालीं एवढ्यानेंच मराठी वाङ्मय कृतकृत्य होणें शक्य नव्हतें. जन्मास येऊन लालनपालन झाल्याप्रमाणें मराठी वाङ्मयास तरुण व्हावयास पाहिजे होतें. त्याच्या विकासानेंच तें आतां शोभायमान दिसणार होतें. या वेळीं हिंदुस्थानांतील बंगाली, हिन्दी, तामिळ इत्यादि वाङ्मयें पुष्ट व सुदृढ बनत चाललीं असतां मराठी वाङ्मयाचें यापुढें कौमार्यांतच गुरफटून राहणें त्यास कमीपणा आणणारें होतें. ह्मणूनच आम्ही ह्मणतों कीं जन्मास येण्यापेक्षां अर्वाचीन मराठी वाङ्मयास तारुण्य प्राप्त होणें ही गोष्ट अधिक महत्वाची आहे. यांत काय महत्वाचे आहे असें वाटणें शक्य आहे. परंतु पुष्कळ वेळीं असें होत नाहीं म्हणून याचे महत्व वाटते. जन्मास पुष्कळ गोष्टी येतात परंतु कांहीं कालानें त्या केवळ नामशेष होतात. ऐन उमेदीत येऊं पाहणारे प्राणी अदृश्य होतात! सिद्धीस जाऊं पाहणारे बेत फसून जातात! बहर येण्यास योग्य अशीं रोपटीं जळून जातात! आणि काळजीनें घडविलेले मनाचे मनोरे वाळूचे ठरतात!— किंबहुना असें कोणते महत्कृत्य तडीस गेलें आहे कीं ज्याला निराशेचा एकही गोता खावा लागला नाहीं?

अर्वाचीन मराठी वाङमयासंबंधानेंही हीच गोष्ट प्रत्ययास येते. विचाऱ्यास कौमार्यकालाचे उल्लंघन करण्यास पन्नास वर्षांचा अवधि लागला व तें उल्लंघन करण्यापूर्वीही त्यास एका अकल्पित भयंकर दिव्यांतून पार पडावें लागलें! हें भयंकर दिव्य कोणतें?

हे भयंकर दिव्य म्हणजे सन १८५७ सालचे शिपायांचें बंड होय. कारण ज्या विश्वविद्यालयाच्या व्यापक शिक्षणाचें महाद्वार सरकारानें या पूर्वीं पहिल्यानेंच उघडें करून हिंदुस्थानांतील इतर देशी वाङ्मयाप्रमाणें मराठी वाङ्मयाच्या अभ्युदयास गति देण्याचा उपक्रम केला ते द्वार, नेमक्या याच सालीं पेटलेल्या शिपायांच्या बंडांतील वणव्याच्या ठिणग्या वणव्याच्या जोरानें उडूं लागल्यामुळें, बंद होण्याची भीती सर्वत्र प्रतीत होत होती. आणि असें झालें असतें तर आपलें मराठी वाङ्मय कदाचित् जागच्याजागीं विरामही पावलें असते! मग त्यास तारुण्य प्राप्त होण्याची वार्ताच कशाला?

अर्वाचीन मराठी वाङमयास जन्म देणाऱ्या या अर्वाचीन शिक्षणाचा व त्यावर ऐनवेळीं आलेल्या संकटाचा इतिहास फार मनोरंजक आहे. त्याची यथातथ्य कल्पना होण्यास एका तज्ज्ञाचा पुढील अभिप्राय देणेंच योग्य आहे.

" It is just a quarter of a century since the principle was laid down, by the Government of India in 1835, after long and important discussion that the grand object of the Government in connection with the education of the people of the country, should be the diffusion of European literature and of modern science. Loud was the opposition on the part of those who, with no lack of learning or ability and with many plausible appeals to old associations and the supposed predilections of the people advocated the cause of absolete Oriental learning, and of ancient but fantastic science. The same results which were foretold as likely to flow from the abolition of Suttee, the same which, in more recient times, have been, I believe most unjustly, attributed to the permission of widows to marry again, and to the removal all forfeitures and disabilities by reason of change of religious belief–, were prophesied as likely to flow from the radical change in the national education. That change, however, was carried out, to the infinite advantage, I believe, of thousands who have since received the elements of an useful education and of millions more who will receive them, I trust in time to come. Ten years after that change-so much had education prospered under it–the Council of Education addressed the Court of Directors and suggested that the time had come when a University might be established with effects, at least in Bangal. But, nine years afterwards, in July 1854, a period ever memorable in the annals of Education in this country, the Court sent a Despatch which for the

breadth and comprehensiveness of its views, for the sagacity with which it availed itself of the experience of the past, and provided for the lofty tone of wisdom and benevolence which pervaded it, was probably not surpassed by any despatch that ever emanated from that great body, now numbered with the things that are past.

By that despatch, the Court directed the organization of Universities at Calcutta, Madras and Bombay. In pursuance of that despatch, in the first month of 1857, our ( Calcutta ) University was founded. All throughout India was peaceful, and every thing appeared to promise a prosperous course to the new University. It had not been founded six months when the mutinies broke out. Removed as we happily were, from the crash of arms, the mutinies had no direct effect upon our educational establishments in Bengal. But it was impossible that the indirect effect of such a stprm shoul be not left even at those parts which were best shaltered and most remote from the centre of its fury.............. Powerful minds in Europe took alarm : and mistaking as I believe they did, the causes of the fearful outbreak which deformed the fair face of the land they augured gloomily of the success of the plans of 1854, and thought it would be prudent and expedient to retrace the steps then taken...Surely at any other time those statesmen would have admitted that a system, announced in England in 1854, promulgated in India in 1855, matured, so far as the establishment of one university, in the first month of 1857, had

had no fair trial by the fifth month of 1857, when the mutiny broke upon us." ×

परंतु असें व्हावयाचें नव्हतें. मराठी वाङ्मयाची भवितव्यता इतकी कनिष्ठ नव्हती. मे. एल्फिन्स्टन साहेब आणि मेजर कँडी या मराठी भाषेच्या व मराठी वाङ्मयाच्या आद्य इंग्रज कैवाऱ्यांचें अथवा हरी केशवजी, बाळशास्त्री जांभेकर, सदाशिव काशिनाथ छत्रे, दादोबा पांडुरंग, परशुरामपंत गोडबोले, कृष्णशास्त्री चिपळुणकर, गोविंद नारायण माडगांवकर, भास्कर दामोदर पाळंदे, विष्णुबुवा ब्रम्हचारी, गणेश सदाशिव लेले, कृष्णशास्त्री राजवाडे, व महादेवशास्त्री कोल्हाटकर इत्यादि आद्यवाङ्मय प्रवर्तकांचें परिश्रम वायां जावयाचे नव्हते. लवकरच सर्वत्र शांतता नांदूं लागली आणि अपकारक होऊं पाहणारें बंडाचें वावटूळ मराठी वाङ्मयास पुढें उपकारकच झालें. कालपरत्वें आणि देशपरत्वें या किंवा अशा प्रसंगाचे परिणाम लोकस्थितीवर काय घडतात हें ठरविण्याचें हें स्थल नव्हे व महाराष्ट्राचा या विचित्र घटनेशी कसा नाजुक संबंध पोंहचत होता, याचीही येथें चर्चा करीत बसण्याचें कारण नाहीं. आम्हांस येथें येवढेंच दाखवायाचें आहे कीं, शांततास्थापनेनंतर असें प्रसंग वाङ्मय निष्पत्तीस पहिल्यानें कारणीभूत होतात. या एका घटनेवर देशी विदेशी सर्व भाषांत ग्रंथरचना झाली आहे. हिचा इतिहास तयार झाला आहे, हिच्यावर कित्येक कादंबऱ्या* आणि कवनें झालीं आहेत, इतकेंच नव्हें तर या एका सत्तावन सालच्या बंडानंतर नुसत्या आमच्या मराठी वाङ्मयांत बायकांचें बंड, पुरुषांचें बंड, तोतयाचें बंड, भिक्षुकशाहीचें बंड, मुलांचें बंड इत्यादि दहा पांच बंडें झालीं आहेत! असो.

---

× The Hon'ble Mr. William Ritchie, vice Chancellor of the Calcutta University, in his convocation address of the 6th. March 1860.

* विष्णु जनार्दन पटवर्धनकृत 'हंबीरराव आणि पुतळाबाई' ही याच बंडावर दक्षिणाप्राइज कमेटीकडून प्रसिद्ध झालेली कादंबरी असून हिच्या संबंधानें न्यायमूर्ति रानडे यांनीं "हंबीरराव नायक व पुतळाबाई नायिका यांचें वर्णन माझे मतें फार चांगलें साधलें आहे. त्या उभयतांचें दाखविलेले गूण राष्ट्रास भूषणदायक आहेत. हंबीररावाचें वर्णन बरेंच आहे. पण पुतळाबाईचें तर खचित फार उत्तम आहे व नानासाहेबांचें वर्णन यथायोग्य झालें आहे" असा आपला अभिप्राय दिला आहे.

बंडाचें वावटळ नाहींसें होऊन पूर्ववत शांतता नांदूं लागल्यानें विश्वविद्यालयाच्या व्यापक व उच्च शिक्षणाचा लाभ सर्वांस मिळण्याची बंडापूर्वी केलेली योजना अमलांत येऊन, अनुक्रमें कलकत्ता, मद्रास व मुंबई येथें विश्वविद्यालयें स्थापण्यांत आलीं. मुंबई युनिव्हर्सिटी शेवटीं स्थापन झाली व तिचें पहिलें कॅलेंडर सन १८६१ साली प्रसिद्ध झालें. सन १८५७ साली मुंबई युनिव्हर्सिटीची स्थापना झाल्यानंतर शाळा पाठशाळा याजवरील जुन्या पंडितांचा अधिकार संपून त्या युरोपियनांच्या हाताखालीं देण्यांत आल्या. जुने पंडित निवळ मराठी जाणणारे म्हणून त्यांना संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें करण्याकडे नेमिले तरी कृष्णशास्त्री चिपळुणकर, केरोपंत छत्रे, महादेवशास्त्री कोल्हटकर यांच्या सारखे जे इंग्रजी भाषाही शिकले होते त्यांनां प्रिन्सिपाल, रिपोर्टर, व क्युरेटर अशा वरिष्ठ प्रकारच्या जागा देण्यांत आल्या.

सन १८५९ सालीं मॅट्रिक्युलेशनची पहिली परीक्षा झाली. तेव्हांपासून महाराष्ट्राच्या सुशिक्षित लोकांच्या पहिल्या पिढीपासूनची माहिती मिळते. मॅट्रिक्युलेशनच्या या पहिल्या परिक्षेंत मुंबईच्या शाळेंतून रामकृष्णपंत भांडारकर, महादेव गोविंद रानडे, वामन आबाजी मोडक, महादेव नारायण परमानंद, खंडेराव चिमणाजी बेदरकर, बाळ मंगेश वागळे, व जनार्दन सखाराम गाडगीळ वगैरे मंडळी आणि पुण्याच्या शाळेंतून बाबा गोखले, व्यंकटराव रामचंद्र व विष्णु बाळकृष्ण सोहनी वगैरे मंडळी पास झाली. सन १८६२ सालीं झालेल्या पहिल्या बी. ए. च्या परिक्षेंत, पहिल्या वर्गात महादेव गोविंद रानडे व रामकृष्णपंत भांडारकर आणि दुसऱ्या वर्गात बाळ मंगेश वागळे व वामन आबाजी मोडक हे चार महाराष्ट्रीय गृहस्थ उत्तीर्ण झाले. पुढें सन १८६३ त ३, १८६४ त ५, १८६५ त ७, १८६६ त ७, व १८६७ त ११ गृहस्थ पास होऊन त्यांनीं पहिल्या पांचच वर्षांत वरील चारांची संख्या चाळीस केली. नंतर १८६८ त २०, सन १८६९ त २ व सन १८७० त १८ मंडळी पास झाली व त्या योगानें वरील संख्येची पुन्हां दुप्पट होऊन पहिल्या आठ वर्षांत आमच्या पदवीधरांची संख्या ८० वर गेली.

मुंबई विश्वविद्यालयाच्या या पहिल्या आठ वर्षांच्या कारकिर्दींत बी. ए. च्या अभ्यासक्रमांत मराठी भाषेचा समावेश होता मॅट्रिकच्या मराठी परिक्षेसाठीं परशुरामपंत गोडबोले कृत नवनीत, महिपतिकृत भक्तिविजय, कृष्णशास्त्री चिपळुणकरकृत अनेकविद्यामूलतत्वसंग्रह व दासबोधाचीं कांहीं दशकें आणि बी. ए. च्या परिक्षेसाठीं मंडलिककृत हिंदुस्थानचा इतिहास, विद्येचा उद्देश, लाभ आणि

संतोष, सृष्टिजन्य ईश्वरज्ञान, व मुक्तेश्वर मोरोपंतांची कांहीं पद्यें नेमलेलीं असत. यावेळीं मराठी भाषेच्या परिक्षक मंडळींत पहिल्या पहिल्यानें डॉ. विल्सन, डॉ. ही, मेजर कँडी वगैरे इंग्रज गृहस्थ व नंतर वि. ना. मंडलिक, दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळुणकर वगैरे एतद्देशीय गृहस्थ व त्या नंतर म. गो. रानडे, म. मों. कुंटे व वि. मा. पाठक वगैरे पदवीधर नेमीत असत.

या आठ वर्षांत वरील ८० पदवीधरांपैकीं वामन आबाजी मोडक, खंडेराव चिमणाजी बेदरकर, रामचंद्र विष्णु माडगांवकर, महादेव मोरेश्वर कुंटे, केशव बापुजी बाळ, श्रीराम भिकाजी जठार, जनार्दन सखाराम गाडगीळ, बळवंत सिताराम नाईक, काशिनाथ रामचंद्र गोडबोले, रामचंद्र गोविंद ओक, नारायण विनायक साठे, बळवंत भिकाजी वखारकर, महादेव चिमणाजी आपटे, कृष्णराव गोपाळ देशमुख, सीताराम विश्वनाथ पटवर्धन, कृष्णराव अंतोबा चेंबुरकर, सदाशिव विश्वनाथ धुरंधर, नरहर गदाधर फडके, दामोदर भिकाजी जठार, रामचंद्र गोविंद भनगळ, आनंदराव सखाराम बर्वे, हरि भागवत केसकर व बाळाजी बापूजी साने इत्यादि तेवीस गृहस्थ मराठी भाषा घेऊन बी. ए ची परिक्षा पास झाले.

सन १८६२ सालीं झालेल्या बी ए. च्या परिक्षेत मराठीचे परीक्षक डॉ. विल्सन व डॉ. ही या आंग्ल पंडितांनीं मराठीचा पुढील नमूनेदार पॅरेग्राफ भाषांतराकरिता दिला आहे.

" जर घड्याळाचा कांटा दिवसाचा तास दाखवितो आणि नियमाने आपल्या मार्गानें जातो असें आपण पाहिलें तर आपण निश्चय करितों कीं त्या कांट्याचा नियम करणारी जी कळा आहे ती कळा उत्पन्न करणारा कोणी कुशळ प्राणी होता. या रीतीनें सूर्य चंद्र आणि दुसरे अंतरिक्षांतील जड पदार्थ नियमित काळीं भ्रमण करितात. ऋतूचे भेद नियमाने उत्पन्न करितात, आणि जड विश्वास आयुष्य आणि एकरूपता देतात, असें जेव्हां आपण पाहातों तेव्हां ते सूर्यादिक एके मोठ्या कारणापासुन अपार बुद्धीपासून, अपार शक्तीपासून, उत्पन्न झाले या विषयीं आपल्या मनांत संशय राहत नाहीं. जसें साफ न केलेल्या धातूचे कित्येक खरवरीत तुकडे मिळून आपाप चाकें आणि कमाणी होतील आणि आपाप जसें नियमित चमत्कारिक यंत्र घडले जाईल हें मानणे जसें असंभाव्य आहे, तसेच अंतरिक्षांतील जडांमध्यें आणि दिवस, महिने व वर्षेंही पुनः पुनः येतात यामध्यें जो चमत्कारिक बंदोबस्त अनुक्रम आणि एकरूपता दिसूं येतात तीं कोणी तरी त्याप्रमाणें योजिल्यावांचून होतात. असें मानणेंही असंभाव्य आहे."

परंतु पुरे. पॅरग्राफ संपविण्याचें कारण नाही. जुन्या पंडितांचा अधिकार संपून वाङ्मय नियमनाचें काम युरोपियन विद्वानाकडे गेल्यामुळें येथे मराठी भाषा अशा विकृत स्वरूपांत आपणास दिसत आहे हें उघड आहे. परंतु सुदैवानें ही अवस्था फार दिवस चालली नाहीं. आणि सुदैवानेच सन १८६२–६३ सालीं मराठी परिक्षकांचें काम माधवरावजी रानड्यांकडे आलें. आलेली ही कामगिरी त्यांनीं ताड्यात इतक्या उत्कृष्ट रितीनें बजाविली आहे कीं, महाराष्ट्र वाङ्मय घटनेच्या व नियमनाच्या पहिल्या प्रवर्तकांच्या जागीं ते शोभतात. सन १८६२–६३ सालीं झालेल्या मॅट्रिकच्या परिक्षेंत माधवरावजींनीं भाषांतराकरितां पुढील मजकूर दिला आहे:–

## झोप.

" आपणास न कळतां आपणांस झोप लागते, हें ईश्वराच्या शहाणपणाचें प्रमाण होय. झोंप लागण्याच्या प्रकाराचा विचार जर आपण करावयास लागलों, तर त्यानेंच झोंपेचें निवारण होतें. आपण विचार करण्याचें काम सारें बंद केल्यावांचून आपणास झोंप लागावयाची नाहीं. झोंप न बोलाविता येते, त्या अवस्थेंत विचाराचा कांहीं संबंध नाहीं.... ...

ह्या विचार अंमळ पुढें चालवून, झोंप लागल्यावर आपली किती चमत्कारिक अवस्था होते ती पहा! जागृत असतां जे जे पदार्थ आपण पाहतों ते ते पदार्थ नाहींतसे होतात. आणि आपण जिवंत असून जिवत आहों हे आपणास समजत नाहीं. हृदयाचे उडणें, रक्ताचें वाहणें, भक्षिल्याचें पचणें, निरनिराळ्या रसांचें उत्पन्न होणें, अशीं शरारांतील सर्व कामें खळ न पडतां व अव्यवस्था न होतां यथास्थित चालतात. आपला जीवात्मा झोंपेत अगदीं स्तब्ध, म्हणजे व्यापारशून्य होतो; आणि जागृत अवस्थेमध्यें जे विषय मनांत भिन्न भिन्न रूपांनीं भासत असतात, ते विषय जशी जशी झोंप लागत जाते तसे तसे एकमेकांत मिसळत जातात. इंद्रियें मंद होत होत आपला व्यापार सोडितात. स्नायूंची गति मंद होतां होतां शेवटीं शरीराचा सर्व ऐच्छिक व्यापार बंद राहतो. एकूण झोंपीं गेलेल्या मनुष्याची अवस्था सर्व प्रकारें चमत्कारिक आहे. तितकी चमत्कारिक दुसरी अवस्था मनुष्यास मिळावयाजोगी बहुतकरून एकच राहिली आहे. जो कोणी ह्या झोंपेचा विचार करील त्याला त्या दुसऱ्या अवस्थेची आठवण होईलच होईल. ती दुसरी अवस्था कोणती म्हणाल तर महानिद्रा, म्हणजे मृत्यु होय. त्याच्या येण्याच्या पूर्वी आपण तयार असावें; राहिलेल्या वेळाचें सार्थक्य करावें, आणि आपली चित्तें ज्ञानमार्गाकडे वळतील असा आपण आपल्या आयुष्याच्या दिवसांचा सुमार पहावा."

# अर्वाचीन मराठी वाङ्मय

माधवरावजी रानडे यांचें मराठीवरील प्रेम अंतःकरणपूर्वक आणि दृढ होतें. माधवरावजीकडून एखाद्या स्वतंत्र बहुमोल ग्रंथाची भर मराठींत पडली नाहीं, या मुद्यावर त्यांच्याकडे येणारें अर्वाचीन मराठी वाङ्मयाचें शंकराचार्यत्व कांहीं लोक हिराऊन घेऊं पाहतात. परंतु ही त्यांना चूक आहे. कारण हा मुद्दा ग्रहण केल्यास या मुद्यावर कै. कृष्णशास्त्री चिपळुणकर, कै. काशिनाथपंत छत्रे, हरि केशवजी वगैरे विद्वानांसही अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या जनकपदावरुन खाली ओढतां येईल. आम्हांस तर या वेळी रानड्यांकडे आलेली जबाबदारी व त्यांनी ती ज्या रितीनें बजाविली ती रीत, तसे करू देत नाहीं.

ज्ञानदेव आणि मुकुंदराज हे आमचे व्यासवाल्मिकी असतील, दादोबा पांडुरंग आमचा पाणिनी आणि कृष्णशास्त्री चिपळुणकर आमचे जगन्नाथ-कालिदास असू शकतील, विष्णुशास्त्री चिपळुणकर आमचा जॉन्सन आणि राजवाडे गिबन धरतां येतील, शंकर मोरो रानडे आमचा बिल्हण आणि हातवळणे व जोशी कात्यायन ठरवितां येतील तर कै. माधवरावजी रानडे हेही अर्वाचीन मराठी वाङ्मयाचे शंकराचार्य खास होत. मराठी वाङ्मयाच्या अभ्यासाची पद्धतशीर रीत पहिल्यांने माधवरावजींनींच लावून दिली आणि अर्वाचीन मराठी वाङ्मयाची पहिली मोजदाद-मग ती इंग्रजीत कां असेना-माधवरावजींनीच केली. हें काम त्यांनी सरकारी हुकुमावरून मराठी ट्रान्सलेटर या नात्याने सन १८६६ त केले व त्या वेळीं मराठी वाङ्मयाविषयी त्यांनी पुढील प्रमाणे शेरा दिला. " सध्याची मराठी भाषेची स्थिती पुढील उत्कर्षाची सूचक आहे आणि अर्वाचीन हिंदुस्थानांतील सुप्रगल्भ भाषांमध्ये मराठीस पहिलेच स्थान थोड्याच काळांत मिळेल असा सर्वस्वी संभव दिसतो. " सारांश, अर्वाचीन मराठी वाङ्मयावर रानड्यांचे उपकार अगणित आहेत व ते त्यास विसरणे केव्हांही शक्य नाही. किंबहुना " महाराष्ट्रांतील तेज अनेक कारणांनीं सर्वस्वी नष्ट होऊन तो एक थंड गोळा बनला असतां, त्यांत फिरून जिवंतपणाची ऊब कशी येईल, व तो गोळा आपले हातपाय कसे हालवू लागेल याचा सर्व-विचार करून, आणि तें दुर्धर काम स्वतः अंगावर घेऊन त्याकरितां जिवापाड जर कोणी मेहनत केली असेल तर ती प्रथम माधवरावजींनींच केली " असें जे रानड्यांचें वैशिष्ट्य ह्मणून लो. टिळकांनी वर्णन केल्याचे केळकर सांगतात ते अयथार्थ आहे असे कोणास वाटेल ?

दुसरी मंडळीही माधवरावजींच्या फार मागे नव्हती. नव्हे-कित्येक त्यांची बरोबरी करीत होते तर कित्येक त्यांच्या पावलावर पाऊल टाकून महाराष्ट्र वाङ्मय

क्षेत्राचा मार्ग आक्रमीत होते, उदाहरणार्थ, पहिल्याने पदवीधरांचीच गोष्ट घ्या. मुंबई युनिव्हर्सिटीच्या पहिल्या आठ वर्षांच्या कारकिर्दीत बी. ए. झालेल्या ८० गृहस्थांत ज्या २३ गृहस्थांनीं मराठी भाषा घेऊन बी. ए. ची परिक्षा उत्तीर्ण केली व ज्यांचा या काळच्या वाङ्मयाशी विशेष संबंध येतो असे बरेच गृहस्थ आहेत. तथापि त्यांतल्या त्यांत वामन आबाजी मोडक (१८३५)* महादेव मोरेश्वर कुंटे (१८३५) आबाजी विष्णु काथवटे (१८४६) आणि आनंदराव सखाराम बर्वे (१८४५) हीं नांवें आपणापुढे आपोआप उभी राहतात.

मराठी न घेतां संस्कृत किंवा दुसरी भाषा घेऊन पदवीधर झालेल्या या कालच्या दुसऱ्याहि कित्येक विद्वानांचे मराठीविषयींचे प्रयत्न चिरस्मरणीय झाले आहेत. अशा गृहस्थांत शंकर पांडुरंग पंडित (१८४०) अण्णा मोरेश्वर कुंटे (१८४४) शांताराम अनंत देसाई ( ? ) कान्होबा रणछोडदास कीर्तिकर (१८४९) शंकर मोरो रानडे (१८५०) व विष्णुशास्त्री चिपळुणकर (१८५०) वगैरे मंडळी प्रमुख आहेत.

हे पदवीधरां संबंधाने झालें. परंतु या वेळीं उसळलेली साहित्यसेवेची ही लाट फक्त पदवीधरांसच स्फूर्ति देणारी होती असे नाही. पदवीधरांइतकें इंग्रजीचें ज्ञान मिळवून पदवीधरांपेक्षां जास्त साहित्यसेवा करणाऱ्या व अर्वाचीन मराठी वाङ्मयांस ललामभूत अशा अनेक व्यक्तींची नांवे आम्हांस देतां येतील. उदाहरणार्थ, सखाराम अर्जुन राऊत (१८३९), विनायक कोंडदेव ओक (१८४०), रामचंद्र भिकाजी गुंजीकर (१८४३) गोविंद शंकर बापट (१८४४), जनार्दन बाळाजी मोडक (१८४५) कृष्णाजी पांडुरंग गाडगीळ (१८४७) बाळाजी प्रभाकर मोडक (१८४७) इत्यादि ग्रंथकारांचीं; सोकर बापूजी त्रिलोकेकर (१८३६) विनायक जनार्दन कीर्तने (१८४०) व बळवंत पांडुरंग किर्लोस्कर (१८४३) इत्यादि नाटककारांचीं; सूर्याजी सदाशिव महात्मे (१८३७), नारो केशव रिसबुड, लक्ष्मण मोरेश्वर हळवे, व केशव लक्ष्मण जोरवेकर सारख्या कादंबरीकारांची व नारायण हरी भागवत ( १८४९ ) सारख्या प्रहसनकाराची; बजाबा रामचंद्र प्रधान ( १८३८ ) बापूसाहेब कुरुंदवाडकर ( १८३८ ), पांडुरंगशास्त्री पारखी (१८४४) नारायण धोंडदेव खांडेकर ( १८४७ ) आणि विठ्ठल भगवंत लेंभे ( १८५० ) इत्यादि कवींचीं; पुरुषोत्तम गोविंद नाडकर्णी ( १८४४ ) हरी माधव पंडित ( १८४९ ) इत्यादि निबंधकारांचीं; अथवा तुकाराम तात्या पडवळ ( १८३६ ),

* नांवांपुढील आंकडे जन्मसालाचे ( इ. स. ) आहेत.

जावजी दादाजी चौधरी ( १८३९ ) व रावजी श्रीधर गोंधळेकर ( १८३१ ) या मुद्रणविश्वांतील यशस्वी कारखानदारांचीं नांवें आणि त्यांनीं केलेली कामगिरी कोणास माहीत नाहीं ? तसेंच जोतीबा फुले यांनी प्रारंभ केलेला 'सत्यशोध' या कालांतील नारायण मेघाजी लोखंडे ( १८४९ ) धोंडीराम नामदेव, कृष्णराव भालेकर, गणपत सखाराम पाटील, डॉ. संतूजी रामजी लाड, माधवराव घाटवळ, दर्याजीराव थोरात, व भाऊ पाटील वगैरे मंडळींनीं चालू ठेवला होता हे त्यांस भूषणावह नव्हतें असें कोण ह्मणेल ?

सन १८५७ ते सन १९१० पर्यंतचा कालच अवाचीन मराठी वाङ्मयेतिहासांतील अत्यंत महत्वाचा काल आहे. पहिल्या ४५–५० वर्षांशीं दुसऱ्या ४५–५० वर्षांची तुलना केल्यास या दुसऱ्या कालांतील मराठीवाङ्मयाने गांठलेला पल्ला त्यास निःसंशय भूषणावह होता. 'अर्वाचीन मराठीवाड्मय' या प्रौढ नामाभिधानाची सार्थकता करणाऱ्या वाड्मयाचा पाया या कालांत विशेष मजबूत झाला. हें काम यांतील जितकें पहिल्या पचवीस वर्षांतील लेखकांकडून तितकेंच ते दुसऱ्या पंचवीस वर्षांतील लेखकांकडून झाले आहे. पहिल्या पंचवीस वर्षांतील लेखकांनीं, पहिल्या पिढीतील ग्रंथकारांनीं तयार केलेला अर्वाचीन मराठी वाङ्मयशकट ताज्या दमानें चालविण्यास सुरुवात केली न केली तोंच दुसऱ्या पंचवीस वर्षांतील लेखकांनीं त्यास विलक्षण वेगवान करण्याचें श्रेय घेतले व दोघांनीं मिळून अर्वाचीन मराठी वाङ्मयाचें सुंदर व गोजिरवाणें मंदिर उभें केलें.

वरील मंडळींचा समावेश या काळच्या साहित्य सेवकांच्या पहिल्या श्रेणींत होतो आणि या श्रेणीच्या साहित्यसेवेचा मध्यकाळ अदमासें सन १८५७ ते १८८५ हा धरतां येतो. हा काल जसा वाङमयेतिहासांत तसाच तो महाराष्ट्राच्या समाजेतिहासांतही संस्मरणीय आहे. किंबहुना या काळच्या वाङ्मयाविषयी महाराष्ट्राच्या तत्कालीन सामाजिक व राजकीय परिस्थितीसच जबाबदार धरणें योग्य होईल. या कालांत अखिल भारतवर्षांत व त्यांतल्यात्यांत महाराष्ट्रांत लोकसंग्रह अथवा लोकक्षोभ करणाऱ्या अनक घडामोडी झाल्या आहेत व या सर्व घडामोडींचें प्रतिबिंब या वेळच्या वाङ्मयांत स्पष्टपणे दिसून येतें. उदाहरणार्थ, सार्वजनिकसभा, राष्ट्रीयसभा या सारख्या सभांचो व आर्यसमाज, प्रार्थनासमाज व सत्यशोधकसमाज या सारख्या समाजांची स्थापना, न्यू इंग्लिश स्कूल, फर्ग्युसन कॉलेज व डेक्कन कॉलेज या सारख्या शिक्षण संस्थांची स्थापना, पुनर्विवाहाची व परदेशगमनाची चळवळ, निबंधमाला, केसरी व सुधारक यांसारख्या नियतकालिकांचा

अवतार, सन १८७६–७७ सालांतील दुष्काळ व वासुदेव बळवंत फडके यांचे बंड श्री मल्हारराव गायकवाड यांची पदच्युति व श्री. सयाजीराव महाराजांचे राज्यारोहण, हिंदुस्थानांतील प्लेग, रँडसाहेबांचा खून पंडिता रमाबाई आणि त्यांचे शारदासदन, शिवाजी उत्सव, गणपतीचे मेळे, राजद्रोहाचे खटले व लोकांची धरपकड इत्यादि गोष्टींस वाङ्मयापासून अलिप्त ठेवणे केवळ अशक्य होते.

भरतीच्या वेळी जशी पहिलीहून दुसरी व दुसरीहून तिसरी लाट अधिक जोरदार दूरवर जाणारी असते व या क्रमाने भरती येते; त्याप्रमाणे मराठी वाङ्मयसेवेविषयीं पहिल्या पिढीपेक्षां दुसरी पिढी अधिक जोमदार, त्याच्याहून पुढील पिढी अधिक स्वतंत्र विचाराची, तिच्याहून पुढील पिढींत स्वातंत्र्याच्या इच्छेबरोबर स्वार्थत्यागाची बुद्धि अधिक उदित झालेली अशी परंपरा दृष्टोत्पत्तीस येते. पहिल्या पिढींत आम्हांस थोडासा साक्रेटीस, थोडासा वन्यन व थोडासा शेक्सपिअर माहीत झाला होता. परंतु विश्वविद्यालयाच्या व्यापक, उदार आणि उच्च शिक्षणाचा प्रचार अधिकाधिक होऊं लागतांच पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांनीं, पाश्चात्य इतिहास वेत्त्यांनी, पाश्चात्य समाजशास्त्रवेत्त्यांनी पाश्चात्य कवींनी आणि कादंबरीकारांनी—सारांश, पाश्चात्य विचारपद्धतीनें आमच्या दुसऱ्या व तिसऱ्या पिढीतील सुशिक्षितांच्या आचारविचारांत जबरदस्त परिवर्तन घडवून आणिले.

या परिवर्तनाचा परिणाम अर्वाचीन मराठी वाङ्मयावर फारच कल्याणकारक झाला व बाल्यकौमार्यांत संगोपन पावलेले त्याचे स्नायु आतां कोठे बळकट दिसूं लागले. व मिळालेल्या नवजीवनामुळें ते त्यास शोभूंही लागले. बाल्यांतील बालिशपणा व कौमार्यांतील शालीनतेस आतां त्यास झुगारून द्यावे लागले. तारुण्याची धडाडी त्यास निर्भय करूं लागल्यामुळें असाध्य असें त्यास आतां कांहींच वाटेनासे झालें, या वेळीं त्याची जबाबदारी वाढली, कर्तव्यक्षेत्र वाढलें, महत्वाकांक्षा वाढली, अवलोकन शक्ति वाढली, स्वाभिमान वाढला इतकेंच नव्हे तर यथेच्छ कोड पुरविणारे पालक मिळाल्यामुळे आतां आमच्या वाङ्मयाचें सर्वत्र प्रकार वाढले. आतां त्याची रुचि व रसिकता वाढली, त्याचीं सुखं वाढलीं व तशींच दुःखेंही वाढलीं. आतां ते क्षणांत एक आणि क्षणांत दुसरें करूं लागले! क्षणांत वेदांताचा गंभीर आव आणूं लागले! क्षणांत धर्मशील होऊं लागलें! क्षणांत साहित्यचर्चा तर क्षणांत काव्यशास्त्र विनोद करूं लागले! क्षणांत ईर्षा तर क्षणांत पश्चात्ताप पावूं लागले! क्षणांत ध्यानस्थ तर क्षणांत कर्तव्यतत्पर आणि क्षणांत किंकर्तव्यमूढ झालें तेंही

याच कालांत. क्षणांत आपल्या प्रियेशी तें हितगुज करूं लागलें, क्षणांत तिच्या विरहामुळे तें रडूं लागले आणि क्षणांत तिच्या पुनर्मीलनामुळे तें आतां आनंदू लागले! सारांश, या कालच्या वाङ्मयास प्रत्येक क्षणीं मिळणारी आंदोलनें आज आपणास आनंदानें डोलावयास लावतात. असो.

नामदार रानडे यांनीं सन १८६४ आखेर ६६१ छापील ग्रंथांची यादी केली. पुढें जानेवारी १८६५ पासून १८६७ जून आखेरची यादी कै. कृष्णशास्त्री चिपळुणकर यांनी केली, तींत त्यांनीं २२१ नवीन ग्रंथ नोंदले. या नंतर पुढील सहा वर्षांतील नोंदीची माहिती मिळत नाहीं परंतु सन १८७४ पासून १८८५ पर्यंतच पुढील माहिती मिळते:—

| साल. | नवीन ग्रंथ. | पुन: प्रकाशित. | भाषांतरें. | एकूण. |
|---|---|---|---|---|
| १८७४ | १०१ | ३९ | २० | १६० |
| १८७५ | १२९ | ६७ | १९ | २१५ |
| १८७६ | १२७ | ९८ | १२ | २३७ |
| १८७७ | १४५ | १०० | १२ | २५७ |
| १८७८ | १०४ | ७३ | १८ | १९५ |
| १८७९ | ८० | १०६ | २३ | २०८ |
| १८८० | १४१ | १८५ | १७ | ३४३ |
| १८८१ | ११० | १०६ | १२ | २१८ |
| १८८२ | १४२ | १५६ | २८ | ३२६ |
| १८८३ | १५० | ११२ | ४६ | ३०८ |
| १८८४ | १३६ | १३४ | ४५ | ३१५ |
| १८८५ | २२१ | २१७ | ४९ | ४८७ |
| एकूण | १५८६ | १३९२ | ३०१ | ३२७९ |

वरील संख्यांची बेरीज केली असतां असें दिसून येतें कीं, या बारा वर्षांत १५८६ नवीन मराठी ग्रंथ तयार झाले व ३०० भाषांतरें प्रसिद्ध झालीं आहेत. म्हणजे दर वर्षास सरासरी १२५ नवीन ग्रंथांची आणि २०–२५ भाषांतरांची भर मराठी ग्रंथसंग्रहांत पडली. शेवटच्या आसनाकडे नजर दिली तर कांहीं चढउतार झाल्याचा प्रकार दिसतो. सन १८७४ सालीं विष्णुशास्त्री चिपळुणकर यांची निबंध-

साला जन्मास आली त्याचें दुसरें सालीं ५६ ग्रंथांची चढ दिसते. त्यापैकीं २८ नवीन ग्रंथ होते व २८ पुनर्मुद्रितांत होते, व भाषांतराच्या सदरांत एक कमी झाला. तथापि या सालापासून सन १८७७ पर्यंत सारखा चढ आहे. पुढें दुष्काळाच्या दोन सालांत ग्रंथांनाही दुष्काळ भोवला. पण हा तोटा १८८० सालीं भरून आला. पुन्हा १८८१ साली थोडा झोका बसला, तो १८८२ साली जों सांवरला तो सांवरला. या पुढें मग प्रत्येक वर्षी चढच आहे.

वरील कोष्टकांतील चौथ्या आसनाची बेरींज ३२७९ येते. या संख्येतून पुनरावृत्तीची संख्या ( १३९२ ) व भाषांतर ग्रंथांची संख्या ( ३०२ ) वजा केली असतां निवळ नवीन ग्रंथ १५८१ राहिले. तसेंच या कोष्टकावरून आणखी एक अनुमान निघतें. तें हें कीं ग्रंथप्रकाशनाच्या दृष्टीनें सन १८८५ हें साल सर्वात श्रेष्ठ दिसतें. या साली प्रत्येक आसनातील आंकडे बाकीच्या सालांपेक्षां अधिक प्रमाणांत आहेत.

आतां या कालांतील वाङ्मय प्रवर्तकांचा, त्यांच्या कामगिरीचा आणि प्रसंगानुसार तिच्याविषयींच्या लोकमताचा कालानुक्रमेंच परिचय करून घेऊं, म्हणजे त्या बरोबरच या कालांतील वाङ्मयाचे स्वरूपही अधिक स्पष्ट होईल.

**१ महादेव मोरेश्वर कुंटे** [ १८३५–१८८८ ] "हे लोकप्रसिद्ध वक्ते, आणि कवी साताऱ्याजवळ कृष्णातिरी श्रीक्षेत्र माहुली येथे जन्मले. हे जातीचे कोंकणस्थ आश्वलायन ब्राम्हण. ह्यांनी बालवयांत आपले वडील वेदमूर्ति मोरभट कुंटे ह्यांजपाशी बहुतेक ' ऋक्संहिता ' म्हटली होती. पदरीं गरीबी असून लहानपणीं कोणी शास्ता नसल्याने हे फार हूड असत. परंतु बारा वर्षांचे झाल्यानंतर ह्यांस विद्या शिकावी असे वाटलें. म्हणून ते आईस न विचारतां एकदम घरांतून निघून पुण्याकडे पळून गेले. पण मग पुढें ह्यांच्या मातुश्रीनी त्यांस कोल्हापूर येथें विद्याभ्यासास ठेविलें. तेथें मधुकरीवर निर्वाह करून ह्यांनीं मराठी आणि इंग्रजी अभ्यास चांगला केला. पुढे इग्रजीचें ज्ञान वाढविण्याच्या हेतूनें हे सन १८५६ ह्या वर्षी मुंबई येथें डॉ. वुइल्सन ह्यांच्या शाळेंत विद्यार्थी झाले. हे स्वभावतः जबरदस्त अभ्यासी असल्याने वुइल्सन साहेबाचें मेहेरबानीस पात्र झाले, आणि ते ह्यांस थोडेबहुत निर्वाहासही देऊ लागले. त्यामुळें अभ्यासक्रम सुरळीत चालून हे सन १८६४ त बी. ए. झाले. पुढें दुसऱ्याच वर्षी ह्यांस कराचीच्या हायस्कुलांत हेडमास्तरची जागा मिळाली. नंतर सन १८६७ पासून कांही काल कोल्हापुरास नोकरी केल्यानतर सन १८७१ साली यांची नेमणूक पुण्याच्या हायस्कुलावर झाली. या जागेवर

ते अखेरपर्यंत होते. हे उत्कृष्ट वक्ते व शिक्षक असून ह्यांस कविता करण्याचा नाद असे. हे कवि व ह्यांची कविता निरंकुश आहेत. तथापि कोठे कोठे तिचे वास्तविक स्वरूप प्रसन्न व उज्वल दिसून येते. ह्यांनीं ' राजाराम महाराज ' 'राजा शिवाजी' आणि ' मन ' अशीं तीन काव्ये केलीं आहेत व ती स्वतंत्र पुस्तक रूपानें प्रसिद्ध आहेत. " ( अर्वाचीन कविता पृ. )

२ " हे प्रारंभीं प्रार्थनासमाजपंथी होते, पण अखेर यांचे विचार सनातन धर्माकडे वळले होते. " ( मनोरंजन १९१० )

३ " माधवराव कुंटे हे विद्वत्तेच्या दृष्टीनें रानड्यांचें खालोखाल होते. पुण्याच्या हायस्कूलच्या हेडमास्तराची जागा हा त्या वेळचा मोठा मान त्यांना मिळाला होता. ते चांगले वक्तेही होते. " Vicissitudes of Aryan civilisation " हे त्यांचे पुस्तक पाहिलें म्हणजे गहन विषयांतही त्यांची गति थोडी बहुत चाले असे दिसतें. उद्योगीपणाबद्दल त्यांची ख्याती होती. पेन्सीलीचा एक कारखाना त्यांनीं आरंभिला होता. गायनशास्त्र शिकण्याचे मनांत येतांच त्याच्याही खटपटीस ते कांहीं काळ बसले. पण त्याच्या विद्वत्तेत व स्वभावांत आचरटपणाची मोठीच गोम होती, ती पदोपदी दिसून येई. लिहिण्याचा फर्डा पण कोठें वाहवेल याचा नेम नाही. बोलावयास उभे राहिले की इंग्रजी भाषेचा मुसळधार पाऊस पडे, पण मग त्यांत कोठचीं किती गटारें वाहून येतील याचा नेम नाहीं. गायनकलेचा अभ्यास अगदी एकांतांत करणें अवघड खरें, पण कुंटे यांच्या कर्कश चढया आवाजाची तालीम सुरू झाली की सगळ्या आळीला नकोसें होऊन जाई; ' जितके माझे बाप तितकेच ब्राम्हण श्राद्धाला सांगेन ' असें उत्तर भाविक आईला सांगण्याइतका अवोन्यपणा, पण वेळ पडली ह्मणजे पायांत चाळ घालून चिपळ्या घेऊन भजन करण्याची तयारी ! शाळेत मुलांनां शिस्त व अभ्यास शिकविणारे हेडमास्तर स्वतः कसे बसत किंवा मुलांनां काय बोलत याचें वर्णन आम्ही लिहिणे म्हणजे स्वतःच शिष्टाचार सोडणे आहे सन १८७२ सालीं ज्ञानप्रकाशांत " मी कोण व माझें नांव काय " या मथळ्या खालीं एक पत्र छापलें होतें, त्यांत कुंटे हे मुलांशीं बोलतांनां किती आचरपणाचे शब्द वापरीत यांचें दिग्दर्शन केलें होतें. व बहुधा कुंट्यांनाच उद्देशून ( विष्णु ) शास्त्रीबोवांनी एके ठिकाणीं असें लिहिल्याचे स्मरतें कीं, जगांतील असतील नसतील ते कुशब्द आणून त्यांच्या डोक्यावर घातले तरी ते अपुरेच होतील. " [ केळकर कृत लो. टिळकांचें चरित्र खंड १ ला पृष्ठ ८२ ]

४ " मि. कुंटे हे विद्वान् खरे, कदाचित् आमचे विद्वान लोकांत त्यांचे इतका वाचलेला, त्यांचे सारखा इंग्रजींत चटकदार लिहिणारा, त्यांचे सारखा तात्काल स्फुर्तीनें आवेशयुक्त व श्रोतृजन एकदम थक्क करून टाकणारा असा वक्ता सांपडणेंही कठीण आहे. तसेंच मि. कुंटे यांचा विद्येविषयीं अव्याहत व्यासंग, बरेंच वय झालें असतांही संस्कृत भाषेचा अभ्यास सुरू करून ' षड्दर्शन चिंतनिके ' सारखें पुस्तक चालविण्यापर्यंत मजल पोंहोंचविणे, शिवाय अलीकडे कांहीं गृहविपत्तीनें त्यांचें चित्त व्यग्र झालें असतांही देशी कलाकौशल्याविषयीं नुसती कोरडी हकाटी न करितां पेन्सलीचा कारखाना काढून आपले अंगाला व द्रव्याला झीज लावून घेणें या त्यांच्या पुष्कळ प्रसंशनीय गोष्टीबद्दल आह्मीं त्यांस पूर्ण चाहातो. परंतु त्यांचेकडे पूना हायस्कूलचे अधिपत्य जे सुमारे सोळा, सतरा वर्षे होते त्याकाळांत त्यांचें विद्वत्तेपासून शाळेस फायदा थोडा व नुकसान फार झालें असें कोणीही निःपक्षपाती मनुष्य कबूल करील. त्यांची नेमणूक शाळेवर न होतां एखादे ऑफिसावर होती तर त्यांचे पुष्कळ अमोलिक गुणांचे सार्थक झालें असतें. परंतु पुणेकरांचे नशीबानें ते त्यांचे हायस्कूलाचेच वाट्यास आले ! पुणे शहरांतील विद्यार्थ्यांचे अंगा जो एक तऱ्हेचा उद्दामपणा, टवाळपणा, मोठमोठे लोकांविषयीं अनादर बुद्धि व कोणतीही सभा किंवा व्याख्यान प्रसगीं घोंटाळा करून देण्याची हौस दृष्टीस पडते यांचें बरेच श्रेय मि. कुंटे यांच्याकडे येण्यासारखें आहे. "

[ विष्णुशास्त्री चिपळुणकर यांचें चरित्र पृ. ९८. ]

५ " मराठीमध्यें पाश्चात्य नमून्यावर काव्य करण्याचा अगदीं पहिला प्रयत्न कुंटे यांनीं केला. राजा शिवाजी हे त्यांचें महाकाव्य चांगल्या पैकीं आहे. परंतु कित्येकांनीं या काव्याची केवळ नवीन म्हणून फजिती उडविल्यामुळें त्यांचें काव्य पुरे प्रसिद्धही झालें नाहीं. त्यांनीं ' मन ' म्हणून तात्विक विषयावर नवीन तऱ्हेचें काव्य लिहिलें. परंतु त्याचीही तीच अवस्था झाली. ' आतां हे कविमन्य तत्त्वज्ञानी बनले ! ' म्हणून त्यांच्यावर खरमरीत टीका आली. कुंटे यांचा प्रयत्न वाईट नव्हता. त्यांच्या कवितेच्या उद्योगाला ज्या प्रकाराचीं नावें ठेविलीं, तशीं ठेवण्याचें कारण नव्हतें. त्यांचा चरितार्थ लोकाश्रयावर अवलंबून नव्हता. परंतु कुंटे हे शांतपणें लोकापवाद सोसून घेणारे नसल्यामुळें त्यांनीं आपला ग्रंथ पुरा प्रसिद्ध केला नाहीं. त्यानंतर त्यांनीं कवीपणाच सोडून दिला. ही मराठी वाङ्मयाची मोठी हानी झाली. "

[ मराठी भाषेची घटना पृ. २८८–८९ ]

**सोकर बापूजी त्रिलोकेकर** [ १८३६–१९०८ ] पाठारे प्रभु. हे महाराष्ट्रांतील संगीताचे आद्यप्रवर्तक होत. त्या वेळचे, मुंबईतील प्रसिद्ध मराठी शिक्षक धोंडोपंत मावळणकर यांच्या मराठी शाळेंत, सोकरजीचा प्राथमिक अभ्यास झाल्यावर, ते 'एल्फिन्स्टन इन्स्टिटयूशन' नामक पाठशाळेंत गेले. त्यावेळीं, हल्लींचें विश्वविद्यालय स्थापन झालें नव्हतें. तरी, वरील पाठशाळेंत 'वेस्ट स्कॉलर' च्या परीक्षेपर्यंत म्हणजे हल्लींच्या बी. ए. इतकें त्यांचें शिक्षण झालें.

कॉलेज सोडल्यावर, रा. त्रिलोकेकर हे मुंबईतील 'प्रभु सेमिनरी' नामक शाळेंत व नंतर सरकारी सेंट्रल स्कूलमध्यें कांहीं दिवस शिक्षक होते. पुढे १८६४ साली, हायकोर्टातील ट्रान्स्लेटर व इन्टरप्रिटरची जागा त्यांस मिळाली. तेथे वाढत वाढत शेवटीं ते सेकंड ट्रान्स्लेटर झाले व त्यांस दरमहा ४५० रुपये पगार मि लागला. ह्या जागेचें काम त्यांनीं इतक्या चांगल्या रितीनें बजाविलें कीं, त्याबद्दल मुंबई हायकोर्टाचे मुख्य न्यायाधीश सर जोसेफ आर्नोल्ड, सर चार्लस सार्जंट, सर चार्लस फॅरन व न्यायाधीश ग्रीन व म्यारियट यांनीं त्यांस उत्तम प्रकारची शिफारस पत्रें दिलीं आहेत.

सरकारी नौकरींत असतां, फावल्या वेळीं कांहीं स्फुट कविता करण्याचा रा. त्रिलोकेकर यांस फार नाद असे. पुढें १८७९ साली, त्यांनीं 'नलदमयंती' हे गद्यपद्यात्मक नाटक प्रसिद्ध केलें. त्याचे रंगभूमिवर पुष्कळ प्रयोग होऊन ते फार लोकप्रिय झालें. महाराष्ट्रांत, रंगभूमीवर आलेलें पहिलें संगीत नाटक हेंच होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पुढे के. किर्लोस्कर हे उदयास आले व त्यांनीं आपल्या नाटकास 'संगीत' हें विशेषण दिलें. वास्तविक पाहतां संगीत ह्या शब्दाचा अर्थ गायन असा आहे. अर्थात 'गद्यपद्यात्मक' नाटकास संगीत हा शब्द लावावा किंवा कसें हा मोठा प्रश्न आहे; व ह्या बाबतींत, त्यावेळीं किर्लोस्कर व त्रिलोकेकर यांचा बराच वाद होऊन, रा. त्रिलोकेकरांचें मत किर्लोस्करांनीं मान्य केलें व आपल्या शाकुंल नाटकाच्या प्रयोगाच्या हस्तपत्रकावर 'संगीत शाकुंतल' असें न लिहितां 'गद्यपद्यात्मक शाकुंतल' असें लिहिलें. हें हस्तपत्रक अद्याप, रा. त्रिलोकेकर यांच्या संग्रहीं असून, प्रस्तुत लेखकानें तें पाहिलें आहे.

नळदमयंती नाटकाच्या मागून, रा. त्रिलोकेकरांनीं 'हरिश्चंद्र' नाटक लिहिलें व त्याचेही प्रयोग होऊन ते इतकें लोकप्रिय झालें कीं, त्याच्या कित्येक आवृत्यांच्या हजारों प्रती आजपर्यंत खपून गेल्या आहेत, या नाटकास द. प्रा. कमिटिने बक्षीस

दिलें आहे. पुढें त्यांनीं ' सावित्री ' नाटक लिहिले, त्यासही चांगलें यश आलें. ह्या नाटकासही दक्षिणाप्राइज कमिटीनें बक्षीस दिलें आहे. या नाटकाचीही दुसरी आवृत्ति झाली आहे. इंटरप्रिटरच्या जागा असल्यामुळें सोकरजींस गुजराथी भाषेचेंही चांगलें ज्ञान झालें व त्या भाषेत त्यांनी ' शनीमहात्म्य ' ' चित्रसेन ' इत्यादि पुस्तकें लिहिलीं आहेत. [ ज. र. आजगांवकर. ]

" पुष्कळांनी रा. आण्णा किर्लोस्कर हेच संगीताचे उत्पादक असें म्हटलें आहे. पण तीं चूक असून वास्तविकपणे हा मान रा. त्रिलोकेकर यांसच मिळाला पाहिजे. रा. जनार्दन महादेव गुर्जर यांनीं रा. त्रिलोकेकरकृत जें संगीत ' हरिश्चंद्र ' नामक नाटक प्रसिद्ध केलें आहे असे त्याच्या प्रस्तावनेवरून दिसून येईल. ते म्हणतात ' सन १८७१ साली मुंबईमध्यें एलिफन्स्टन कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं संस्कृत शाकुंतल नाटकाचा प्रयोग केला. त्यांतील श्लोक, पद्ये प्रत्येक पात्रानें स्वतः रागरागिणींत म्हटलीं. तो प्रयोग संस्कृत होता तरी गायनयुक्त असल्यामुळें सर्व साधारण मनोरंजनास कारणीभूत झाला. तेव्हां पासून त्रिलोकेकर यांच्या कवित्वशक्तीस स्फुरण येऊन आपल्या महाराष्ट्र भाषेत असला प्रयोग करावा असे त्यांस वाटूं लागलें. व त्याप्रमाणे त्यांनी सन १८७९ च्या जानेवारीत ' नलदमयंती ' छापून प्रसिद्ध केलें. याचें प्रयोग ' हिंन्दुसन्मार्ग बोधक मंडळी ' नें रा शंकर मोरो रानडे, वासुदेव नारायण डोंगरे, आणि नारायण हरि भागवत वगैरे नाट्यप्रिय लोकांच्या देखरेखींत व शिकवणीनें केले. तेव्हां त्या वेळीं या अपूर्व महाराष्ट्र प्रयोगाबद्दल वर्तमानपत्रांतून चांगलें चांगलें उद्गार निघून पत्रकारांनी सोकरजीकडे गद्यपद्यात्मक किंवा संगीत प्रयोगाचे आद्यप्रवर्तकत्व दिलें. "

[ आ. वि. कुळकर्णीकृत ' मराठी रंगभूमि ' पृ. ८८ ]

**तुकाराम तात्या पडवळ** [ १८३६-१८९८ ] भंडारी; जन्मस्थान मुंबई. याचे आइबाप हे ९ वर्षांचे असतांना निवर्तल्यानंतर यांना यांच्या भावजयीनें दत्तक घेतले; आरंभीं रेल्वे, व्हालकार्ट ब्रदर्स वगैरे कंपन्यांत नोकरी केल्यानंतर हे शांताराम नारायण यांच्या कंपनींत राहिले व तेथेच यांचा भाग्योदय झाला. हे थिऑसफिस्ट होते, होमिओपाथी वैद्य म्हणूनही यांची प्रसिद्धी असें; हे गोरगरीबांस साह्य करावयास सदैव तत्पर असत; कावसजी पटेल व काळबादेवी रस्त्यावर यांनीं मोफत दवाखाने काढले होते, या दवाखान्यांचा खर्च चालावा म्हणून यांनी ' तत्वविवेचक ' छापखानाही काढला होता; या छापखान्यांतून यांनी तुकाराम,

समजून घेण्यास हीं पुस्तकें फार उपयोगीं आहेत यांत संशय नाहीं. त्यांचे निबंध तर अवश्य वाचण्यासारखे आहेत. त्यांच्या निबंधांची भाषा फार जोरदार व कोटिक्रमयुक्त असून प्रतिपक्षाच्या मर्मस्थानावर मारा करण्याची त्यांची पद्धति निबंधमालेच्या पद्धतीसारखी दिसते. एकंदरींत पाहिलें असतां, त्यांच्या मनावर, भाषेवर, विचारांवर निबंधमालेचा बराच पगडा बसला असावा असे दिसतें

नारायणराव हे, त्यावेळीं मुंबईत निघणाऱ्या ' वार्तांहर ' नामक पत्राचे सात वर्षे संपादक होते. मुंबईत, ' प्रिंटर्स-पब्लिशर्स-बुकसेलर्स असोशियन ' ह्या नांवाची एक संस्था होती, तिचे ते सेक्रेटरी होते. ही सभा, नारायणरावांच्या मृत्यूनंतर नामशेष झाल्याचें समजतें. प्रहसनांपैकीं ' मोर एल्. एल्. बी. ' प्रहसनावर १८८६ सालीं फिर्यादही झाली होती, परंतु त्या पुस्तकांत आक्षेपजक असें कांहीच न आढळल्यामुळे, ती काढून टाकण्यांत आली ! यानंतर, ' अभिनव तरुणीविद्या ' प्रहसनावरही, त्याच वर्षी, फिर्याद करण्यांत आली व चौकशींत लेखक व प्रकाशक हे दोषी ठरून त्यांस दंड करण्यांत आला व पुस्तकें जप्त झालीं. ह्या प्रहसनाचे लेखक कोणी दुसरे गृहस्थ होते, पण त्यांत भागवतांचेंही थोडेंसें अंग होतेंच. ह्या फिर्यादी झाल्यावर रा. भागवत यांनीं, त्याच सालीं, ' सद्यःस्थितीचा रंग अथवा प्रहसन पुस्तकावरील वावटळ ' व सध्यांचे तट व आमच्यांतलि ठळक ठळक भेद ' हे निबंध लिहून प्रसिद्ध केले; त्यांत ह्या फिर्यादींसंबंधाची सविस्तर हकीकत आहे. भागवतांच्या कांहीं प्रहसनांचे रंगभूमीवर प्रयोगही झाले होते; परंतु ते निर्लोभी असल्यामुळें, प्रयोगाच्या हक्काबद्दल, कोणत्याही नाटकमंडळीकडून त्यांनीं कांहीं घेतले नाहीं. सांगलीकर नाटकमंडळीचे मालक रा. धोंडोपंत सांगलीकर त्यांनीं, मोर एल्. एल्. बी. प्रहसनाच्या प्रयोगच्या हक्काबद्दल, त्यांस एकदां ५०० रुपये देऊं केले होते, परंतु ते त्यांनीं घेतले नाहींत. "

[ ज. र. आजगांवकर. ]

**शिवराम रामकृष्ण निरखुरे** [ १८५०-१८७८ ] हे कवि मुंबईत कामाठी पुऱ्यांतील शाळेंत शिक्षक होते, आणि ह्यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यांत झाला होता ह्याच्या पलीकडे ह्यांची कांहीं एक माहिती मिळत नाहीं. ह्या कवीची कविता सरळ, सरस आणि गोड आहे. पित्याचें नांव अखंड चालवील.

[ अर्वाचीन कविता पू. ]

**विठ्ठल भगवंत लेंभे** [ १८५० ? ] शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण. हे कवि पुणें जिल्ह्यांत डमढेरे यांचे तळेंगावीं जन्मले. ह्यांचा मराठी अभ्यास तळेगावीं झाला. नंतर पुणें येथें बाबा गोखले यांच्या इंग्रजी शाळेंत ह्यांस प्रवेशपरीक्षेपर्यंत प्राथमिक शिक्षण मिळालें. ह्यांचे मामा हरिशास्त्री, जे कै. वा. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे सहाध्यायी होते, यांनीं लेंभे यांस नवनीतांर्तल मोरोपंताच्या सर्व कविता शिकविल्या. त्यामुळें ह्यांस कविता करण्याची इच्छा झाली. पुढे वृत्तदर्पणाचा अभ्यास करून ह्यांनीं कित्येक किरकोळ कविता केल्या. घरगुती अडचणीमुळें यांना लवकरच रेल्वेची नोकरी पतकरावी लागली. धाकणी येथे असतां याचा रा. रा. शंकर गणेश देशपांडे यांच्याशी परिचय झाला. त्यांच्याजवळ ह्यांनी कित्येक प्रसिद्ध संस्कृत काव्यांचें अध्ययन केलें. त्याच प्रमाणें रसमाधुर्य, अलंकार, वनश्रीवर्णन इत्यादि उदात्त कवितेला लागणाऱ्या साहित्याचेंही यांनीं परिशीलन केलें. त्या योगे ह्यांची कविताशक्ति प्रगल्भ झाली. ह्यांनी ‘ मित्रदर्शन, ’ ‘ विष्णुनिधन, ’ ‘ शोकावर्त्त ’ आणि इतर बऱ्याच स्फुट कविता लिहिल्या आहेत. पैकी शोकावर्त्त हें काव्य अत्यंत हृदयंगम उतरलें आहे. ” [ अर्वाचीन कविता पू. ]

“ एकोणिसाव्या शतकांत अगदी परवश झालेल्या मराठी कवितेला स्वतंत्र व शुद्ध वळण लावण्याचा व तिचें ऐश्वर्य वाढविण्याचा प्रयत्न ज्या थोर कवींनीं केला त्यांत वि. भ. लेंभे यांची गणना होते. ” अशी यांची किर्ती आहे.

**शंकर मोरो रानडे** [ १८५८–१९१९ ] कोंकणस्थ ब्राम्हण. जन्म वाई येथे मराठी शिक्षण वाईस व इंग्रजी शिक्षण पुण्यास झालें. सन १८६८ हे मॅट्रिक व १८७२ त डेक्कन कॉलेजातून बी. ए. झाले. कांहीं दिवस सरकारी नोकरी केली पण अधिकाऱ्यांशी जमेना म्हणून राजिनामा देऊन ‘ नाट्यकथार्णव ’ मासिक पुस्तक काढण्यास सुरुवात केली. कांही दिवस हे ‘ हंदुप्रकाश ’ व ‘ नेटीव्ह ओपिनियन ’ या पत्राचे संपादक होते. सन १८८४ सालीं ह्यांनां श्री सयाजीराव महाराजांनीं आपल्या पदरी ठेविले. तेथेच अखेरपर्यंत होते. बडोद्याची ‘ सहविचारणी सभा ’ यांनीच स्थापन केली. हे उत्तम ग्रंथकार व लेखक होतें. ह्यांनीं पुष्कळ पुस्तकें लिहिलीं आहेत. हे सुधारक होते: उत्तम कविही होते. ”

[ मनोरंजन १९१०. ]

“ आजपर्यंत महाराष्ट्र भाषेची महती गाऊनच केवळ संतुष्ट न राहतां आपल्या बुद्धिकौशल्यानें व लेखणीनें तिच्या सौंदर्यात ज्यांनीं ज्यांनीं थोडीबहुत

भर घातली आहे अशा मंडळींत—आणि विशेषतः अशा पदवीधर मंडळींत-आमचे मित्र कै. शंकर मोरो रानडे ह्यांस बरेंच उच्च स्थान दिले पाहिजे. ह्या आमच्या ह्मणण्यास महाराष्ट्राच्या कोणत्याही कोपऱ्यांतून अपवाद ऐकूं येईल असें आह्मांस सहसा वाटत नाहीं. महाराष्ट्र भाषेच्या दुर्दैवानें हा मोहरा गेल्या नोव्हेंबर महिन्यांत हा लोक सोडून गेला. रसिकता, चतुरस्रता, समयसूचकता व विनम्रता ह्या चारी बहिणी शंकरराव रानड्यांकडे सदैव सारख्या नांदत होत्या, हें त्यांजबरोबर सहज एखाद्या विषयावर चार शब्द बोलण्याचा ज्याला प्रसंग येई त्याच्या लक्षांत आल्या॰ वांचून राहत नसे.

शंकररावांचा विषय वाङ्मय व त्यांचा अवतारही त्याच्याच अभिवृद्धीकरितां God made Churchill a poet, but destiny made him a schoolmaster—हें जें एका प्रसिद्ध लेखकानें चर्चिल संबंधानें म्हटले आहे तें शंकररावांस अक्षरशहः लागु पडते. नोकरीचा त्यांजवर केवळ आळ आला म्हणा अथवा दैवानें ती त्यांजवर लादली गेली म्हणा, त्यांचें अंतःकरण तिकडे नव्हतें. नोकरी सोडल्यावर ' इंदुप्रकाश ' व ' नेटिव्ह ओपिनियन ' हीं पत्रे त्यांनीं कांहीं वर्षे चालविली. ह्या दोन्हीं पत्रांत त्यांच्या हातून बरेंच उत्तमोत्तम लेखही लिहिले गेले आहेत, नाहींत असें नाहीं. तथापि हेंही काम नोकरी प्रमाणेंच करावयाचें म्हणून त्यांनीं केलें. त्यांच्या मनाचा ओढा बिलकूल तिकडे नव्हता. बहुतेक सर्व दिवस शिक्षणांत, आपल्या विद्यार्थ्यां बरोबर किंवा घरी आलेल्या इतर मंडळी॰ बरोबर निरनिराळ्या विषयांच्या चर्चेत, विनोदांत किंवा पुस्तकावलोकनांत घालवावा; रात्रीं एखाद्या नाटक मंडळी कडून आमंत्रण आलें तर नकार न करितां आदरानें त्यांच्या तालमीच्या खोलींत जाऊन निरनिराळ्या पात्रांस त्याच्या त्याच्या अभिनयाची दीक्षा द्यावी, व आपल्या पत्राच्या प्रसिद्धीचा वार नजीक आला म्हणजे आयत्या वेळीं छापखान्यांत जाऊन पत्रास लागणाऱ्या मजकुराची भरती करून द्यावी असें हमेशा होत असे. विद्यालयांत असतांना सर्वांगरमणीय अशा संस्कृत व इंग्रजी वाग्वधूच्या सौंदर्याचा व विविधविलासांचा त्यांजवर जो पगडा बसला होता तो इतका अजब होता कीं बी. ए. होऊन कॉलेज सुटलें, नोकरी धरावी लागली, दुसरेही चरितार्थाचे मार्ग पहावे लागले, तथापि आपल्या ह्या दोन्ही सांगातिणीचा त्यांनीं आपणास कधीही विसर पडूं दिला नाहीं. वाङ्मयासंबंधी—विशेषतः काव्य॰ नाटकाच्या बाबतीत कसलीही शंका शंकररावांकडे घेऊन जा किंवा स्मृतिपथास सोडून गेलेल्या गद्यपद्याच्या एखाद्या चरणाचा थांग लावून या मात्र खोटी, कीं

शंकररावांपुढें कालिदास, भवभूति, बाण वगैरे संस्कृत कविच नव्हत तर शेक्स्पीयर, मोलियरसारखे परदेशीय कविही दत्त उभे. एक चरण असो वा संबंध पद्य असो; पुस्तकास हात न लावितां लागलीच म्हणून दाखवावयाचे. इतकें हे काव्यनाटकावर असलेलें निःसीम प्रेम सरकारी हपिसाच्या एकाद्या कोपऱ्यांत पडून अथवा साप्ताहिक पत्रांच्या फायलींत दडून रहावें असा ईश्वरीसंकेत नव्हता. म्हणूनच जणुं काय नाट्यकथार्णवाच्या द्वारें ते प्रकट करून आमच्या महाराष्ट्र देशांत खरी रसिकता व सहृदयता जागृत करण्याची इच्छा शंकररावांस झाली. नाट्यकथार्णवाचा पहिला अंक बाहेर पडतांच सामान्य वाचकांचींच नव्हेत तर चांगल्या चाणाक्ष परीक्षकांचींही मनें त्यांतून प्रसिद्ध झालेल्या शिलादित्य व मथुरा ह्या कादंबऱ्यांचे स्वरूप पाहून कांहीं काळपर्यंत साशंक व विस्मित झाली. ह्या दोन्हीही पाश्चिमात्य बायांस देशी पेहराव देण्यांत शंकररावांनीं दाखविलेली हातचलाखी इतकी बेमालुम होती कीं आमच्या प्राचीन स्थितिरीतींच्या दर्शक अशा ह्या ऐतिहासिक कादंबऱ्या होत असा पुष्कळांचा त्यावेळी समज झाला होता. ते कांहीं असो; परंतु सूक्ष्मदृष्टीनें पाहिले तर नाट्यकथार्णवाच्या द्वारें शंकररावांनीं आमच्या मराठी भाषेस एक नवीनच मनोहर वळण लावून दिलें, ह्यांत शंका नाहीं. नाट्यकथार्णवाच्या जन्मापूर्वी व अलीकडे पंधरावीस वर्षांत मराठी भाषेंत प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांतील कथानकें, विषय व भाषासरणी ह्यांची परस्परांशीं तूलना करून पाहूं गेलें तर मागच्यांत व हल्लींच्यांत काय काय अंतर पडलें आहे तें सहज लक्षांत येईल. नाट्यकथार्णवांतून प्रसिद्ध झालेलीं नाटकें व कादंबऱ्या ही संस्कृत व इंग्रजीचीं मराठी भाषांतरें नव्हत तर रूपांतरें आहेत. शंकररावांची स्वतःची कल्पकता त्यांत नाही, हें खरें. तथापि एका भाषेंतून एकादे काव्य, नाटक किंवा कादंबरी दुसऱ्या भाषेंत आणणें नव्हे तर ती जणूं काय त्याच भाषेपासून निर्माण झाली आहे हे दाखविणें सोपें नाहीं. ह्याला भाषाज्ञान तर हवेंच; पण पुष्कळशीं कल्पकताही लागते. इतिहासाचीच नव्हे तर परस्पर भिन्न अशा देशांतील लोकांच्या स्थितिरीतींची व आचारविचारांची चांगली ओळख करून घ्यावी लागते. गाय् फॉक्स, केट्स्वी, किंग लीयरसारख्या परदेशीय पात्रांना, शिलादित्य, कार्तिकशंभू किंवा अतिपीड हीं देशी नांवें दिल्यानेंच कार्य भागत नाहीं. नांवाप्रमाणें त्यांचे आचारविचारही मूळकथानकाच्या सौरस्याची हानि न करितां आपल्या देशांतील लोकांच्या रीतीरिवाजांस साजतील अशा रीतीनें बदलले पाहिजेत. हें काम फार कठिण आहे. तथापि शंकररावांनीं तें इतकें चोख व बेमालुम केलें आहे कीं जों जों त्यांच्या ह्या कृतीचें अवलोकन करीत जावें तों तों त्यांच्या बुद्धिमत्तेचेंच नाहीं तर मार्मिकतेचें व योजकतेचें अधिकाधिक

कौतुक वाटूं लागतें. नाट्यकथार्णवांतूनच प्रसिद्ध झालेलें व रंगभूमीवरहि झालेलें त्यांचें डोक्टरवैद्यप्रहसनच घ्या डाक्टर व वैद्य ह्यांच्या वाक्संग्रामाचें, उभय पक्षांतील मंडळीच्या गुणावगुणाचें व पर्यायाने कांहीं उच्च वर्णांतील लोकांच्या गृहस्थितीचें शंकररावजींनीं जें अप्रतिम चित्र रेखाटलें आहे, त्यावरून त्यांची शोधकबुद्धि, कल्पकता व मार्मिकता ह्यांची सहज कल्पना करितां येण्यासारखी आहे. शंकररावांची पद्यरचनाही अशीच सुरेख आहे. त्यांनीं एकदें स्वतंत्र काव्य लिहिलें नाही खरें, तथापि त्यांची थोडीबहुत पद्यरचना जी रतिमन्मथ नाटकांतून व इतरत्र प्रकट झाली आहे, ती फार वरच्या दर्जाची आहे इतकेंच नव्हे, तर तींत असलेला प्रसाद, सुलभता व सरलता अर्वाचीन काव्यग्रंथांत क्वचितच आढळते. मी कवि नाहीं, असें ते म्हणत असत. परंतु कोणी कसल्या हो विषयावर कांहीं पद्यरचना अमुक एक वृत्तांत करून द्या म्हटलें, तर सद्यस्फूर्तीनें असें सुरेख व श्रुतिमनोहर पद्य रचून दाखवीत कीं, वृत्तदर्पण पुढें ठेवून गणमात्रा जुळवीत बसणाऱ्या अलीकडील कित्येक संगीतनाटककारांस त्यांच्या त्या कृतीचे मोठें आश्चर्य वाटे. ”

[ वि. ज्ञा. विस्तारांतील मृत्युलेख ]

**महादेव बाळकृष्ण चितळे उर्फ बापूसाहेब भाजेकर**-भाजेकर हे रावसाहेब भाजेकर म्हणून एक प्रसिद्ध गृहस्थ होते, ह्यांचे कनिष्ठ बन्धु होते. ‘मनोरमा’ ह्मणून सुमारें ४ वर्षांपूर्वी एक सामाजिक नाटक प्रसिद्ध झाले होते त्याचे कर्ते भाजेकर होत. डेक्कनकॉलेजांत विद्यार्थि असतांना त्यांनी हें नाटक स. १८७१ त लिहिलें. यांत सद्य:स्थितीचें चित्र फार चांगले दाखविलें आहे. सुनांना सासवांचा जाच, लग्नकार्यांतले विहिणींचे रुसवे फुगवीचे प्रकार, वृद्धांशी तरुण मुलींचीं लग्ने, गतभर्तृकेचें वाईट मार्गांत पाऊल पडलें असतां घडलेले दुष्परिणाम विद्यार्जनाकरितां परदेशीं गमन इत्यादि सामाजिक चर्चेतले विषय या नाटकांत कर्त्यानें गोवले आहेत. पुनर्विवाहाच्या व बालविवाहाच्या वादाचा आरंभ याच सुमारास होता. तेच विषय नाटकरूपानें पुढें आणलेले आहेत. कित्येक ठिकाणीं या नाटकांत अश्लीलपणा झाला आहे व ह्याबद्दल त्या वेळीं वर्तमानपत्रांतून व मासिक पुस्तकांतून टीकाही आल्या होत्या. ते दोष बाजूला ठेवले तर हे नाटक भाषेच्या दृष्टीनें व रचनेनें चांगलें उतरलें आहे.

रा. भाजेकर हे नाना गोखले यांच्या शाळेंत मधून शिक्षकाचेंही काम करीत असत. भाज्यांची शाळा जिला हल्ली ‘ नेटीव्ह इन्स्टिटयूशन ’ म्हणतात तिच्याही

उत्पादकांत हे होते. कित्येक वर्षे हे ज्ञानचक्षूतही लिहित असत. पुढें इंदूर संस्थानांत रामपुरा येथील डिस्ट्रिक्ट जज्ज होते. तेथेंच हे १८९२ सालीं वारले.

भाजेकर यांचे समकालीन नातू, कीर्तने यांनीं जरी एकेक किंवा दोन नाटकें लिहिलीं आहेत तरी त्यावरून पुढील पिढीच्या नाटककारांस नाटकें लिहिण्याची स्फूर्ति झाली, हे एक व दुसरे यांच्या नाटकांवरून त्या वेळची नाट्यकलेची स्थिति कळून येते. म्हणून सदरहु नाटककारांचे ऐतिहासिक दृष्टीनें महत्व आहे.

[ महाराष्ट्रीय नाटककार भा. १ ला. ]

**वासुदेव नारायण डोंगरे** [ १८५०-१९०५ ] डोंगरे यांचा जन्म शके १७७२ च्या वर्षप्रतिपदेच्या दिवशीं रत्नागिरी जिल्ह्यांत वाडाजून येथे झाला. यांचा मॅट्रिकपर्यंतचा इंग्रजी अभ्यास मुंबईच्या विल्सन शाळेत झाला. हे ' सुज्ञानबोधक ', ' स्वदेशपत्र ', ' सत्यमित्र ' वगैरे पत्रांतून लेख लिहीत असत. पुढें संस्कृतचे अध्ययन करून इ. स. १८८० मध्यें त्यांनीं नाटके लिहिण्यास सुरुवात केली, व नाटक मंडळी काढून सरासरी १८९५ पर्यंत त्यांनी तो धंदा चालविला. कै. आण्णा किर्लोस्कर यांनीं संगीत शाकुंतल नाटकाचा प्रयोग केल्यावर लगेच पुढें चार, पाच महिन्यांनी म्हणजे इ. स. १८८२ च्या एप्रिल महिन्यांत यांनी मुंबईस संगीत शाकुंतल नाटकाचा प्रयोग करून दाखविला. हा प्रयोग आण्णांच्या शाकुंतल नाटकावरून केला नसून रा. डोंगरे यांनी मूळ संस्कृत नाटकाचे नवें भाषांतर व नवीं पद्यें घालून केला. रा. डोंगरे यांची कवित्वशक्ति चांगली असून त्यांच्या नाटकांत ' भिन्नरागदर्शन विशिष्ट आहे '. म्हणजे गवयी लोक चीजा गातात त्या पद्धतीवर रागबद्ध पद्यांची रचना केली आहे. रा. डोंगरे यांनी आपला शाकुंतल नाटकाचा प्रयोग लोकप्रिय झाला असे पाहिले तेव्हां वेणीसंहार, रत्नावली, मृच्छकटिक, विक्रमोर्वशीय, मालतीमाधव वगैरे नाटकांची संगीतांत भाषांतरें करून त्यांचेही प्रयोग रंगभूमिवर आणले. आण्णा व डोंगरे या दोघांच्या काव्याची तुलना केल्यास असें दिसून येतें की आण्णांच्या पद्यांत संस्कृत शब्दांचा भरणा विशेष नसून साधे मराठी शब्द विशेष आहेत डोंगरे यांच्या पद्यांत संस्कृत शब्द विशेष आहेत; एवढेच नव्हे तर, कोठे कोठे ' मन्मन मधुकर प्रभुपदपद्मा ' असे चरणाचा चरण पद्यांत घातल्यामुळें कित्येक पदें अगदीं दुर्बोध झालीं आहेत. तथापि, त्यांनीं तीं उत्कृष्ट रागांत रचली असून तीं उत्कृष्ट पात्रांच्या तोंडून म्हणविल्यानें मनरंजन होई. रा. डोंगरे यांचे विशेष लोकप्रिय झालेलें नाटक म्हटलें म्हणजे ' संगीत इंद्रसभा ' हें होय. या नाटकाचा प्रयोग नृत्यगायनयुक्त असा होत असे. यांच्या

नाटकांकडे लोकांचा ओढा लागण्यास हे एक दुसरें कारण झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं, आण्णांच्या नाटकांत जसे भाऊराव मुख्य स्त्रीपार्ट करीत तसेंच डोंगरे यांच्या नाटकांत रा. गजाननबुवा हे करीत असत, व आरंभीं भाऊराव व गजाननबुवा यांची तुलना करूं लागले तेव्हां लोक ' गजाननबुवाचें काम कांकणभर चढच होते ' असें म्हणूं लागले. डोंगरे यांची स्वतंत्र नाटक रचना काय ती ' रंगी नायकीण ' या प्रहसनाची आहे. वेश्यागमनाच्या दुर्व्यसनाचें चित्र दाखविण्याच्या उद्देशानें त्यांनीं हें लिहिलेलें आहे. तथापि, त्यांतील भाषा, संविधानकाची ठेवण हीं हलक्या दर्जाची असल्यामुळें व त्याचा प्रयोग करतांनाही पात्रे आपापल्या इच्छेप्रमाणें हवी तितकी स्वतंत्रता घेत असल्यामुळें नाटकांतील उद्दिष्ट हेतूचा परिणाम लोकांच्या मनांवर न होतां उलट ग्राम्य करमणूकीस एक प्रकारें उत्तेजन दिल्यासारखें झालें. या एका नाटका खेरीज डोंगरे यांची बहुतेक सर्व नाटकें चांगलीं असून त्यांचे प्रयोगही चांगले होत असत [ मराठी रंगभूमि, पृ ११६ -२२ ]

**विष्णु कृष्ण चिपळूणकर** [ १८५०-१८८२ ] कोंकणस्थ ब्राम्हण. यांचा जन्म पुणें येथें झाला. १८६५ सालीं मॅट्रिक होऊन डेक्कन कॉलेजांत गेले. तेथे अभ्यासापेक्षां ग्रंथवाचनाकडे फार लक्ष दिल्यामुळे बी. ए. व्हावयास यांनां पांच वर्षे लागली. बी ए. झाल्यावर कांहीं वर्षे यांनी शाळाखात्यांत नोकरी केली. परंतु १८७९ सालीं नोकरीचा राजीनामा देऊन स्वतंत्र उद्योगास आरंभ केला. ' निबंधमाला ' काढून तिच्यांतील लेखांनीं यांनीं महाराष्ट्र हालवून सोडला. ' न्यू इंग्लिशस्कूल, ' ' चित्रशाळा, ' ' किताबखाना ' ह्या संस्था काढल्या व ' केसरी ' व ' मराठा ' हीं वर्तमानपत्रें सुरू केलीं. हे असामान्य बुद्धिमान्, उद्योगी, करारी व बाणेदार पुरुष होते. तसेंच मोठे विद्वान् व खंदे लेखक होते. सर्वच बाबतींत पाश्चात्य अनुकरणाचें बंड विशेषत: सुशिक्षित लोकांत जास्त माजलें व लोकांस आपलेंपणाचा विसर पडूं लागला, इतकेंच नव्हें तर पाश्चात दुर्गुण शिक्षित म्हणविणाऱ्या लोकांत मान्यता पावूं लागले. अशा वेळीं आपलेपणाची स्मृति यांच्या लेखांनीं जागृत केली. व सर्व महाराष्ट खडबडून जागा झाला. सुशिक्षितांचें लक्ष लोकशिक्षण आणि लोकसेवा ह्या श्रेष्ठ कर्तव्याकडे ओढले जाऊन मराठी भाषेच्या सेवेंत व स्वदेशाच्या इतिहासांत त्यांचे मन अधिकाधिक रमूं लागले. साधी राहणी, उदात्त विचार, स्वावलंबन व देशप्रीति इत्यादि महाराष्ट्रीय सद्गुणांची जाणीव ह्यांच्या लेखांनीं तरुण पिढींत प्रदीप्त केली. ह्यांचे लेख व आपल्या आयुष्याच्या अल्पावकाशांत ह्यांनीं केलेली देशसेवा महाराष्ट्र कधींही विसरणार नाहीं. [ मनोरंजन १९१० ]

"ज्याप्रमाणें पवित्र शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें ईश्वरानें प्रचंड आकाश उत्पन्न केल्यानंतर सृष्टिनिर्माणाचें चौथे दिवशीं संध्याकाळीं लहान लहान अगण्य ताऱ्यांचे समुदायांत प्रथमच द्वितीयेचे अत्यंत लहान परंतु रमणीय चंद्रकलेला एकाएकीं उत्पन्न केलें, त्या वेळीं तो प्रसंग जसा अति रम्य व आनंदमय वाटला असेल त्याप्रमाणें आपला देश, आपला धर्म, आपला इतिहास, आपल्या जुन्या विद्या, आपलें कलाकौशल्य वगैरे गोष्टीं विषयी ज्या अनेक भ्रांतिमूलक व अहितकारक अशा कल्पना आपले लोकांत पसरल्या होत्या त्यांचें निरसन करण्याकरितां निबंधमालेचा नूतन उदय झालेला पाहून तो मराठी रसज्ञ वाचकांस अत्यंत रमणीय व आल्हादकारक वाटला असेल यांत नवल नाही! कृष्णशास्त्री यांनीं आपली लेखणी सुमारें पंचवीस वर्षे चालवून ती आपले चिरंजीवाचे हातीं या सुमारास दिलेली पाहून वरील मंडळीस आनंद झाल्यावांचून राहिला नसेल. शिवाय कृष्णशास्त्री यांचे लेखांत जे स्वतंत्र व निर्भिड विचार कधीं आले नव्हते ते चिरंजिवाचें उदात्त लेखांत येऊं लागल्यामुळें लोकांचे मन मालेकडे विशेषेकरून लागले. यापूर्वी इंग्रजी राज्य, इंग्रजी विद्या, इंग्रजी कला, हरएक इंग्रजी गोष्ट यांचे नवीन विद्वान लोकांचे ग्रंथांतून, वर्तमानपत्रांतून, वक्त्यांचे भाषणांतून जयघोषाचा नाद चोहोंकडे दुमदुमून राहिला होता; आणि उलटपक्षी पेशवाईतील शहाणे लोक भटपांड्ये यांचे कावे, प्राचीन विद्या, प्राचीन कला, प्राचीन धर्म इत्यादि विषयांवरील शतपत्रें, घाशीराम कोतवाल, जोतीबांची गुलामगिरी, पुण्याचे वर्णन वगैरे पुस्तकांतून एकसारखी विटंबना व फजितीं हीं चालू होती. सरते शेवटीं इतकी मजल येऊन पोचली कीं प्रत्यक्ष जगद्गुरूस साक्षीकरितां कोर्टांत ओढून नेऊन हिंदुधर्माचे जुने समजुती प्रमाणें अपमान केला असतांही त्याबद्दल वर्तमानपत्रांतून जयजयकारच!! अशी नवीन पक्षाची—त्यांत कोणी जज, कोणी प्रोफेसर, कोणी वकील व पुष्कळ डिग्रीवाले हे असल्यामुळें त्याची सरशी व जुन्या पक्षास कोणी वजनदार पाठबळ देणारा नसल्यामुळें त्याचा पाडाव होऊन तो हतवीर्य होऊन राहिला असतां मालाकाराची प्रथम हळू परंतु स्पष्ट ऐकूं येणारी व जुने पक्षास उमेद आणणारी गर्जना एकाएकीं कानांवर पडल्यानें व शेवटीं मालाकाराचे तीव्र आघातांनी नवीन पक्षांतील प्रमुख प्रमुख वीर घायाळ होऊन त्यापक्षाचा पाडाव झालेला पाहून बहुतेक मराठी वाचकांस जो आश्चर्यानंद झाला असेल त्यावरून आमचे मर्मज्ञ इंग्रजी वाचकांस स्कॉटचे आयव्हानो कादंबरीतील राजपुत्र जॉन यानें आशबी येथें भरविलेल्या टूर्नेमेंटचे प्रसंगाची—की जेथें नार्मन वीरांची प्रथम उत्तम रीतीनें सरशी होऊन स्याक्सन पक्ष फजीत होऊन बसला असतां

कुडून एका सामान्य वीराचे तुतारीची गंभीर गर्जना ऐकून व पुढें लवकरच त्यां स्वदेशीस चढलेल्या जर्मन वीरांस समरांगणांत जीत केलेले पाहून जुन्या स्पायकसन पक्षास जें आनंदाश्चर्य वाटलें—त्याची आठवण झाल्यावाचून रहाणार नाहीं! ”

[ ल. कृ. चिपळूणकरकृत विष्णुशास्त्री यांचे चरित्र ].

“ गेल्या आठ वर्षांत सदरील पुस्तकाचा ( निबंधमालेचा ) जो आम्हां अव्याहत उद्योग केला त्याला आमच्याच देशांत काय, पण पाश्चात्य देशांतही तोड सांपडणार नाही असें म्हटलें असतां गर्वोक्ति केल्याचा दोष माथी येइल असें आम्हांस वाटत नाहीं. मासिक किंवा त्रैमासिक पुस्तकांची कोठेंही स्थिति पाहिली तर एवढा डोलारा कोणी एकट्यानेच शिरीं बाळगिला आहे असें आम्हांस तर अद्याप कोठें आढळलें नाहीं. केवळ भषांतररूप किंवा प्रकाशनरूप पुस्तक असले तर वरील गोष्ट सुसंभाव्य आहे. पण स्वतंत्र निबंधरचनेचा विचार केला असतां ती पद्धत वरच्याहून किती भिन्न आहे हें कोणाच्याही सहजगत्या लक्षांत येणारें आहे. असले काम म्हणजे चार चौघाचे जेव्हां हात लागतील तेव्हा तें उठायाचे ! आज अमक्यानें लिहिलें; उद्यां तमक्याने लिहिलें, हा विषय एकानें घेतला, दुसरा विषय दुसऱ्यानें घेतला, याप्रमाणें ‘ दसकी लकडी एकका बोजा ’ या न्यायानें प्रस्तुतसारखा उद्योग उभारला जाऊन चालत असतो. तर हें बहुजनसाध्य कार्य आम्हीं स्वतःच अंगिकारलें असतां त्यांत इतक्या अडचणी आल्या व ते वरचेवर मागें पडत असे या गोष्टीचें वस्तुतः—पाहतां कोणास आश्चर्य करण्यास कारण नसून इतक्या विषयांवर इतका काळपावेतों आह्मी लेखणी चालविली, आणि कोणा पाशीं एक छदाम किंवा एक ओळही न मागतां, अगर मेहेरबान डायरेक्टरसाहेब किंवा ट्रान्सलेटरसाहेब यांच्या मेहेरबानीची बिलकूल फिकीर न करितां हें महासत्र संपवून आज अवभृथस्नानाला मोकळे होणार हीच विशेष गोष्ट असें ह्मणण्यास फारशी हरकत दिसत नाहीं. त्यांतून आजपर्यंत बडबड्या मंडळीनें कितीका प्रकारचे मानसिक संकल्प केलेले आहेत, व कितीकाप्रकारचे प्रचंड उद्योग हातीं धरून ‘ आरंभशूर ’ त्वाच्या प्रसिद्ध सुत्रांस मात्र दृढतरत्व आणले आहे ही गोष्ट मनांत आणली असतांही आमच्या चतुरशीतिपुष्पमालेकडे पाहून आम्हांसच काय, पण प्रत्येक आम्हाहितेच्छूला आनंद झाल्याविना रहणार नाहीं असें आम्हांस वाटतें. आम्ही विद्यार्थीदशेंत असून आंग्लभौमनिर्मित विद्यापर्वतमार्ग क्रमीत असतांही बाजूंच्या वृक्षलतांच्या पुष्पपल्लवांनीं कित्येक वेळां आकर्षिलेतः—कारण होऊन मधें मधें गमत होतों, व विद्यालयांतील सोळा संस्कार लागून स्वतःसिद्ध होत्साते बाहेर पडतांच वरील वृक्षवाटिकांतच आसन पावून धन्यता जोडावयाची हा आमचा

कृतसंकल्प होता. पुढें जगदीशकृपेनें तसाच योग घडून येऊन आम्हीं 'टेम्पेस्ट' मधील एरियलाप्रमाणें बंधमुक्त होतांच त्याचाच क्रम स्वीकारला, आणि त्याचें फळ प्रस्तुत पुस्तक हें होय. आमच्या पूर्वीचें विद्वानमंडळ हें फार झालें तर आपल्या ठिकाणीच आपण रममाण होऊन वरील पुष्पांचा मकरंद सेवीत असे. पण आम्हीं आपल्या देशबंधूंची आठवण करून त्यांस गीर्वाण व आंग्लभौम पुष्पाकरांतील मधुबिंदूंचा व सौरभाचा यथावकाश व यथाशक्ति लाभ करून द्यावा हें मनांत आणलें. विद्यापिठरूप महानंदांतून पांख फुटून भरारी मारल्यास आज आम्हांस दहा वर्षेंच काय तीं झालीं; पण या एका दशकांतच आमचा पूर्वोक्त संकल्प किती सिद्धीस गेला हें पाहून आम्हांस बरेंच समाधान वाटतें. व पुढील काळाकडे नजर दिली असतां खूप उमेद येते. आमच्या वडिलांनीं आम्हांस विद्योपार्जन समयींच लेखन प्रविष्ट करून ठेवलेंच होतें; व वरील नीडत्यागाच्या वेळेनंतर माजी 'शालापत्रका'चें धुराकर्म त्यांनीं सर्वस्वीच आम्हांवर लोटून दिलें. हें धुरीणत्व चार वर्षें पावेतो आमच्याकडे होतें. पण १८७४ सालापासून तें एका जबरदस्त दुष्ट ग्रहाच्या फेऱ्यांत पडलें व मनुष्य किंवा होडी भोंवऱ्यांत सांपडली असतां कालेंकरून जशी त्यांची गति केंद्रप्रवण होत होत त्यांचा शेवटीं लय होतो, त्याप्रमाणेंच पुढील सालापर्यंत वरील ग्रहग्रस्त पुस्तकाची मजल जेमतेम आटपून शेवटीं बुडालें! हा महान् अनर्थ होण्यास कारण काय झालें म्हणाल, तर मराठी कविता. सदरील विषयाचे पूर्व भाग आटपून महाराष्ट्र कवितेवर आम्ही येऊन ठेपलों होतों, व आरंभी थोडासा उपोद्घात केला होता. या उपोद्घातांत सदरील कवितेचे शत्रु जे मिशनरी त्यांच्या संबंधानें कांहीं मजकूर आला होता. पण येवढेंच कारण ट्रान्स्लेटर साहेबांसारख्या सुज्ञ व सद्धर्मी मनुष्याचा पित्तक्षोभ होण्यास बस होऊन ताबडतोब डायरेक्टर साहेबांचा खलिता सुटला कीं, असला निबंध या मासिक पुस्तकांत पुनः आला तर खबरदार! असो; तर या प्रकारें करून 'शालापत्रका'च्या द्वारें आमचा प्रथमतः लेखनसरस्वतीच्या मुलुखांत प्रवेश झाला. हा होऊन दोन वर्षें झालीं तों आम्हांस स्वतंत्र पुस्तककर्तृत्वाची हौस वाटून प्रस्तुत मालेचा प्रादुर्भाव झाला. याही गोष्टीस आज आठ वर्षें लोटून गेलीं. इतक्या काळांत प्रस्तुत पुस्तकाच्या संबंधानें किती उलाढाली झाल्या, व तितक्यांतून पार पडून आज स्वतंत्र शाळा, स्वतंत्र छापखाना, स्वतंत्र वर्तमानपत्रें, इत्यादि नवीन सृष्टींत आम्हीं कसें येऊन पडलों, हें यापूर्वी आमच्या प्रिय वाचकांस निवेदन केलेलेंच आहे! [ निबंधमालेचा उपसंहार ] मांडे आवृत्ति.

३ "विष्णुशास्त्री चिपळुणकर यांच्या लेखांचें स्वरूप आणि ते निर्माण झाले तो काळ ह्या गोष्टी अशा प्रकारच्या आहेत कीं त्यांच्या महत्वाच्या संबंधानें एकमत

होणें निदान त्यांच्या वेळीं तरी अशक्य होतें. कोणत्याही चळवळीच्या वेळीं सदसद्विचारांपेक्षां मनोविकारास प्राबल्य असतें. शिवाय आमच्या लोकांमध्यें सार्वजनिक आणि लौकिक गोष्टीच्या संबंधाने विचार करितांना खासगी गोष्टी आणि मतें एकीकडे ठेवून समतोल बुद्धि-राखण्याचें तत्व अजूनही आलेलें नाहीं; मग तेव्हां तर नव्हतेंच. यामुळें एका बाजूनें केवळ लेखांचा कडकपणा आणि लिहिण्याची फजीती करण्याची शिस्त पाहून ' वाहवारे शास्त्रींबुवा! कशी मजा केलीत ! ' असे प्रसंशापर उद्गार निघाले तर दुसऱ्या बाजूनें हा केवळ पोरकट, टवाळ लिहिणारा आहे. याचें तोंड बंद केलें पाहिजे असे धिक्कार युक्त ध्वनी निघूं लागले. या गोष्टीला आतां चाळीसांवर वर्षे होऊन गेलीं. भाषेच्या उन्नतीचें त्यांनी मोठें काम केलें आहे, हें सर्व पक्षांच्या लोकांना कबूल करणें भाग आहे. आतां दोषांची आठवण बुजून गुणच ध्यानांत राहणार आहेत, "

[ रा. भि. जोशीकृत मराठी वाङ्मय विवेचन ]

" निबंधमालेंत मेकॉलेच्या विचारांची व टीकापद्धतीची इतकी हुबेहुब नक्कल केलेली आढळून येते व मेकॉलेचा कोटिक्रम, त्याचा तिखटपणा, एखाद्यावर घसरलें कीं त्याला पूर्णपणें चीत करण्याची तऱ्हा, गरुडपक्ष्यासारखे सारस्वताच्या अनेक शाखांत भराऱ्या मारुन लेख बहुश्रुतपणानें, विविध माहितींनें, सफाईदार, सोप्या व जोरदार भाषेनें चित्तवेधक करण्याची हातोटी, वगैरे गुणांचें निबंधमालेनें इतक्या आश्चर्यकारक रितीनें अनुकरण केलेलें दृष्टोत्पत्तीस येते कीं, निःपक्षपाती मनुष्यास मेकॉलेच्या निबंधाचे निबंधमालेनें शिष्यत्वच पत्करिलें आहे काय असें वाटतें. निबंधमालेला मुख्यतः इंग्रजी वाङ्मयापासून स्फूर्ति झालेली उघड दिसते. इंग्रजी उतारे, इंग्रजी वळण, इंग्रजी विचार, इंग्रजी पद्धति, हीं सर्व इतक्या स्वतंत्रपणें निबंधमालेनें स्वीकारलेली दिसतात कीं निबंधमाला खरोखरीच परपुष्ट असूनही पूर्ण स्वतंत्र ग्रंथ झाला आहे. इंग्रजी विद्यावृक्षाला महाराष्ट्रांत पहिलें सरस फळ आलें तें ' निबंधमाला ' होय. " [पांगारकरकृत ' निबंधमालेचे स्वरूप व कार्य.]

शृंगार-वीर-नय-लेख आतां कशाचे ! येईल मात्र भरतें करुणारसाचें
गंभीर धीर रस पूरित वाग्विलास, गेला लया तव पित्यासह आजि खास!
ज्यांच्या गुणीं मुदित पंडित सर्व झाले, गर्वोद्धतासहि जिहीं मदहीन केले,
सर्वत्र ज्यास जयपत्र मिळेच जाण, ऐसे आतां लिहिल निस्पृह लेख कोण ?

वि. भ. लेंभें.

× × × × ×

---

६ निबंधमालाकर्ते.

# उपसंहार.

आता सदहू काळांत वाङमयाच्या निरनिराळ्या शाखांची कितपत वाढ झाली ते पाहू याः—

**कथात्मक वाङ्मय**:—प्रस्तुत काळचे कथात्मक वाङ्मय ( पौराणिक कथा सोडून ) म्हणजे वेताळपंचविशी, भोजकालीदास सारख्या गोष्टींच्या पुस्तकांचें बनलेलें होतें व त्यांत स्त्रियांबद्दल अनुदार कल्पना, चतुर प्रधान व मूर्ख राजा यांचीं चेष्टितें व व्यवहारचातुर्याचे धडे यांशिवाय फारसा अर्थ नसे. इंग्रजी कादंबरीच्या धर्तीवर लिहिलेल्यांत हळबे यांची मुक्तामाला ( १८६१ ) कालानुक्रमांत आद्यस्थान पटकावील. मुक्तामालेस लौकरच घाशीराम कोतवाल, मंजुघोषा, विचित्रपुरी, चंपकमाला वगैरे अद्भुत लीला दर्शविणाऱ्या बहिणी झाल्या. गुंजीकरांच्या मोचनगड, ( १८७१ ) ह्या कादंबरीने अद्भुताची आवड कमी करून ऐतिहासिक दृष्टि प्रथम उत्पन्न केली. हंबीरराव आणि पुतळाबाई,* शिरस्तेदार, शिक्षक, नारायणराव आणि गोदावरी, व सुशील यमुना; † या चांगल्या कादंबऱ्या प्रस्तुत काळांत झाल्या; परंतु अरेबियन नाइट्सच्या अनुकरणामुळे उत्पन्न झालेल्या त्या वेळच्या पर्शियन, चिनी व जर्मन नाइट्स, व स्त्रीपुरुषांच्या दुराचरणा संबंधाच्या गोष्टींची दसकड्यांनी मोजतां येणारीं चोपडीं पाहून त्या वेळच्या लोकाभिरुची बद्दल फार वाईट मत होतें. हरि व त्रिंबक, कुटुंबवत्सल, गलिव्हरचा वृत्तांत वगैरे भाषांतरलेलें बालोपयोगी कथावाङ्मय या काळांत पुष्कळ झालें

**नाटक**:—या सदराखाली पुष्कळ चांगली पुस्तकें प्रस्तुत काळांत नमूद करतां येतील. परशुरामपंत तात्या यांचीं उत्तररामचरित, मृच्छकटिक, वेणीसंहार व शांकुतल; राजवाडे शास्त्री यांचीं मुद्राराक्षस व विक्रमोर्वशीय हीं संस्कृत नाटकांचीं गद्यपद्यात्मक भाषांतर, मनोरमा, स्वैर सकेशा, डॉक्टर व वैद्य, मोर एल् एल् बी, सौभाग्यरमा, दिवाणी कोर्टीपासून परिणाम, फॅशनेबल वाइफ यांसारखीं सामाजिक सुधारणांचें मंडन अगर खंडन करणारीं बरीं वाईट प्रहसनें, मल्हारराव एक्स गायकवाड हें वर्तमान काळच्या इतिहासावर बसविलेलें नाटक; कीर्तन्यांचें टेम्पेस्ट, सिंबेलाइन—तारा, शशिकला आणि रत्नपाल ( रोमिओ ); हॅम्लेटचे तीन अवतार

* १८५७ च्या बंडावर. † फडक्याच्या बंडावर.

विकारविलसित, वीरसेन व हिंमतबहादर, भ्रांतिकृत चमत्कार वगैरे शेक्स्पीयरच्या नाटकांचीं भाषांतरें; नलदमयंती, शाकुंतल, सौभद्र, रामराज्यवियोग, मालतीमाधव वगैरे आद्य संगीत नाटकें या काळच्या जमेस आहेत. ऐतिहासिक नाटकांत गुणोत्कर्ष व कीर्तन्यांचा माधवराव हीं नांव देण्यालायक आहेत. चटोर नाटकें तसल्या गोष्टींप्रमाणेंच या काळांत फारच फैलावली होती पौराणिक कथांवर जवळजवळ शंभर नाटकें या काळांत झालीं; तशींच ऐतिहासिक नाटकें व प्रहसनें पंचवीस एक झालीं.

**चरित्रः**—रामदासस्वामी, एकनाथ स्वामी, विष्णुबोवा ब्रम्हचारी, पाळंदे, पहिला बाजीराव, परशुरामपंत भाऊ, वामन पंडित यांचीं चरित्रें लिहिलीं गेलीं. परकीय युरोपिअन पुरुषांच्या चरित्रांची संख्या एतद्देशीयांच्या चरित्रसंख्येपेक्षां अधिक आहे! यांत सहस्रबुद्ध्यांचें एकनाथचरित्र व बापटांचे बाजीराव चरित्र हीं पुस्तकें कादंबरीं वजा आहेत व भाषेच्या दृष्टीने जितकीं महत्वाचीं आहेत तितकीं सत्याच्या दृष्टीनें नाहीत. हंसाचा वामन पंडित अप्रतिम आहे. लहान लहान चोपड्यांचा व भाषांतरित चारित्र्यांचा नामनिर्देश करीत नाही.

**इतिहासः**—शालोपयोगी इंग्रजी इतिहासांची भाषांतरें सोडून देतां हें सदर फारच दरिद्री होतं. शिवाजी महाराज व प्रतिनिधी यांचा इ. शिंदे विंचूरकर व आंग्रे घराण्याचे इ, हिंदुस्थानकथारस, गोमांतकाचा प्राचीन व अर्वाचीन इ., वेनेइस्रायल लोकांचा इ.. लोकहितवादीच्या ऐ. गोष्टी, कुर्ग व सीलोनचे इतिहास ही स्वतंत्र व शोधपूर्वक पुस्तकें या काळांत झालीं तथापि इतिहासाच्या नांवावर मनःकल्पित गप्पा झोंकण्याची संवय अजून नष्ट झाली नव्हती असें शिवाजी व दादोजी वगैरे पुस्तकांवर दिसून येतें. सोहनीकृत पेशव्यांची बखर व गोंडसे यांचा ‘ माझा प्रवास ’ हीं पुस्तकें याच काळांतील.

**धर्म**—या विषयावर या काळांत पुष्कळच पुस्तकें झालीं. ख्रिस्ती धर्मानें हिंदु धर्मावर हल्ला निकाराचा चढवून आमचे अनेक विद्याभूषित मोहरे आपल्या ताब्यांत घेतले व शिपाई प्यादे तर असंख्य जिंकले जात होते; त्यामुळें हिंदुधर्माभिमान्यांसही हा हल्ला परतविण्यासाठीं आपलीं शास्त्रास्त्रें परजावीं लागलीं. ख्रिस्ति लोकांनीं असंख्य चोपड्यांत हिंदु धर्माची निंदा केली व त्यांत कांहीं चांगलीं पुस्तकेंही झालीं. बाबा यदमनजी यांचे अरुणोदय हे पुस्तक अशिक्षित हिंदु समाजाची धार्मिक स्थिति समजावून देतें विष्णुबोवा ब्रह्मचारी यांच्या वेदोक्तधर्म प्रकाशामें

हिंदु धर्माचा पुष्कळच बचाव केला जोतीबा फुले यांची 'गुलामगिरी' सारखी चोपडी ब्राम्हणवर्गाच्या द्वेषाची मशागत करीत होती, गुंजीकरांचें सरस्वति मंडळ व भागवतशास्त्र्यांचे त्यावरील उत्तर; ग्रं[illegible]कारद्विजत्वखंडन यांसारखी पुस्तकें जातिद्वेषास वारा घालीत होती.

**नीति व तत्त्वज्ञान:**—यशोदा पांडुरंगी टीका, स्वपराक्रम, नीतिमंदिर, स्वाध्याय, स्त्रीधर्मनीति, सद्वर्तन, विद्यार्थी, गीतापंचदशी, वधूदर्पणमाला यांपैकीं बहुतेक भाषांतरें असून थोरांपेक्षा बाळास उपयोगी आहेत, पण भाषेच्या दृष्टीनें वाचनीय आहेत. ओक व सिमियन बेंजामिन यांची अनेक चोपडी नीतिपर आहेत.

**प्रवास व स्थलवर्णन**—या सदरांत राणीचे पुस्तक ( भा. ) धौममहाबळेश्वर वर्णन, डोंगरीच्या तुरुंगांतील १०१ दिवस, इंग्लंडचा प्रवास, पुणें वर्णन, विजापूरवर्णन, यात्राकल्पलता, तीर्थयात्रा प्रबंध ही निवडक पु. येतात.

**निबंध**—या सदरांत येणाऱ्या या काळच्या सर्व निबंधांत विष्णुशास्त्री यांच्या निबंधमालेचे नाव त्यांची ओजस्वी वाणी व विचारसरणी यांच्या योगें अग्रगण्य झाले आहे. या काळांत नोकरशाही, वर्णशाही व रूढिशाही यांच्या विरुद्ध चिपळूणकर, फुले व लोकहितवादी यांचे हल्ले चढत होते व नावलांवरील मराठ्यांचा निबंध, मल्हारराव व सर टी. माधवराव यांच्या कारभारासंबंधी अनेक नि., कविपंचक, लघुनिबंधमाला, रोगी आणि वैद्य ( कथारूपाने ), ब्रिटिश राज्य व्यवस्था, वगैरे निबंध या काळांत झाले.

**कला:**—जादूटोणा, दारूकाम, अश्वविद्या, यंत्रकला वगैरेवर लहान लहान पुस्तके झाली; वैद्यका संबंधी पुस्तकांत अबला स[illegible]न व बालसंगोपन ही नोंदण्याजोगीं आहेत. कायद्यावर तर या काळांत हल्लीच्या पेक्षा फारच पुस्तकें झाली, देशी भाषेत काम चाले त्याचा हा परिणाम होता.

**काव्य:**—कुंट्यांच्या राजा शिवाजीने आधुनिक कवितेचे शिंग फुंकले गंगा नदीवरील तीन काव्ये, शिवाजी चरित्र, उच्छ्वप्रकाश, अकबर, पार्वती प्रकोप, गणपती निधनाविलाप, पद्य रत्नावली, रघुवंश, षडऋतु वर्णन, समुद्र, महा-

राष्ट्रजन विलाप हीं जुन्या धर्तीची काव्यें झालीं. जमीन मोजणीचीं कोष्टकें व मोऱ्च्या इतिहासांतील ठळक गोष्टींवर देखील कविता झाल्या !

**कोशादि:**—रघुनाथशास्त्री यांचे हंसकोश व भरतखंडाचे ऐतिहासिक कोश; यांशिवाय तळेकर, कॅन्डी आदिकांचे शब्द कोश, कांहीं व्याकरणाची पुस्तकें, व्युत्पत्तिप्रदीप, शब्द सिद्धि निबंध. अलंकारादर्श वगैरे वाङ्मयाभ्यासाचें साहित्य याच काळांत निर्माण झालें.



# अर्वाचिन मराठी वाङ्मय परिशिष्ट ( १ )

इ. स. १८५७–१८८५ या कालांतील प्रमुख मराठी मासिक पुस्तकें.

**अबलामित्र** सं. रावजी हरी आठवले अलीबाग, १८७६

**आर्यमित्र** सं. वासुदेवशास्त्री केमकर, १८८४

**उपयुक्त ज्ञानसागर** सं. का. म. थत्ते, पुणें १८७८

**ऐतिहासिक नाटकमाला** सं. रा. ह. आठवले, अलीबाग, १८८०

**कथाकल्पतरू** सं. कृष्ण याज्ञवल्की, मुंबई, १८७५

**कथारत्नावली** ( जुनी ) सं. विनायक नीलकंठ, मुंबई, १८७४

**कादंबरीकलाप** सं. गो. ब देवल, व श्री. भि. सरदेसाई, पुणें, १८८४

**काव्येतिहाससंग्रह** स ज. बा मोडक, १८७८

**कुटुंब करमणूक** सं. गो. मो. कार्लेकर, १८८३

**गुलजार गुलहौशी** सं. विठ्ठल गोविंद, १८८३

**चित्रदर्शन** सं. नारायण शिवराम माळवणकर, रत्नागिरी, १८८३

**तत्वविवेक** सं. एस. व्ही. केळकर, पुणें, १८८३

**दंभहारक** स. सदाशिव रामचंद्र, १८७१

**धन्वंतरी** सं. परशुराम नारायण पटवर्धन, पुणें, १८८५

**नाट्यकथार्णव** सं. शंकर मोरो रानडे, मुंबई, १८७९

**निबंधचंद्रिका** सं. रा. भि. जोशी, रत्नागिरी, १८८३

**निबंधमाला** सं. विष्णु कृष्ण चिपळुणकर, पुणें, १८७४

**निबंधसार** स. बळवंत आण्णाजी लडू, पुणें, १८७८

**नीत्युपदेश** सं. सीमियन बेजामिन मुंबई, १८८५

**न्यायदीपिका** सं. वामन रामचंद्र ओक, १८७०

**न्यायाश्रम** सं. त्रिंबक नारायण राजमाचीकर, १८६६

**पुणें सार्वजनिक सभेचे मा. पुस्तक** सं. सी. ह. चिपळुणकर, १८८१

**पुष्पगुच्छ** सं. कृ. ना आठल्ये, मुंबई, १८८०

**बालबोध** सं. विनायक कोंडदेव ओक, मुंबई, १८८१
**बालसुमित्र** सं. शं. द. पदे, मुंबई, १८८४
**भारतवर्ष** सं. दत्तात्रय बळवंत पारसनीस, पुणे, १८७३
**मालिका** सं. बळवत रावजी पाटील, पुणे, १८८३
**राजहंस** सं. अनंत वामन वर्वे, १८८२
**लोकहितवादी** सं. गोपाळराव हरी देशमुख, १८८२
**वऱ्हाडशालापत्रक** १८७६
**विद्याकल्पतरू** सं. रावजी केशव सांबारे, ठाणे, व बडोदे, १८६८
**विबुधप्रिया** सं. गोविंद विठ्ठल सिरपाट, मुंबई, १८८४
**विविधकला विस्तार** बडोदे, १८८५
**विविधज्ञानविस्तार** सं. रा. मि. गुंजीकर, मुंबई १८६८
**वीरपत्नी** सं. बाळाजी के. रघुनाथ, मुंबई, १८८१
**वेदांतसमूह** सं. वासुदेव शिवराम जोशी, पुणे, १८८८
**वेदार्थयत्न** सं. शंकर पांडुरंग पंडित, मुंबई, १ ७६
**वेदोक्तसद्धर्मविचार** सं. विष्णुबुवा ब्रम्हचारी, मुंबई, १८७५
**शालापत्रक** सं. कृष्णशास्त्री चिपळूणकर, पुणे, १८६३
**शिल्पकलासंग्रह** सं. व्ही. ए धैर्यवान, पुणे, १८७६
**शेतकरी** सं. सखाराम चिमणाजी गोळे, उमरावती, १८८३
**शेतकी** ( त्रैमासिक ) सं. काशिनाथ महादेव थत्ते, पुणे, १८७६
**षट्दर्शनचिंतनिका** सं. महादेव मोरेश्वर कुंटे, पुणे, १८७७
**सत्यदीपिका** ( नवी ) सं. रे. बाबा पदमजी, पुणे, १८७४
**सर्वसंग्रह** सं. माधव चंद्रोबा डुकले, मुंबई, १८६०
**सुमार्गदर्शक** सं. परशराम भिकाजी भाटे, रत्नागिरी, १८६८
**सृष्टिज्ञान** सं. बळवंत भाऊ नगरकर, मुंबई, १८८५
**संगित मीमांसक** सं. आण्णा घारपुरे, पुणे, १८८४
**स्त्रीज्ञानप्रदीप** सं. लक्ष्मण शंकर अभ्यंकर, ठाणे, १८६९

**हिंदुधर्मविवेचक** सं. राजाराम रामकृष्ण भागवत १८८५
**ज्ञानदीप** सं. सदाशिव पांडुरंग केळकर, मुंबई, १८८४

## अर्वाचीन मराठी वाङ्मय परिशिष्ट ( २ )

कांही विशेष प्रचारांतील अपूर्ण व टोपण नांवे आणि त्यांचे स्पष्टीकरण.

| | |
|---|---|
| **अनंततनय** | दत्तात्रय अनंत आपटे |
| **अरविंद** | भास्कर नानजी शिंदे |
| **अज्ञातवासी** | दिनकर गंगाधर केळकर |
| **आनंद** | विनायक लक्ष्मण बरवे |
| **आनंदीरमण** | जगन्नाथ वामन हर्षे |
| **कमलावर** | गोपाळ गोविंद अधिकारी |
| **काव्यविहारी** | दत्तात्रय विनायक गद्रे. |
| **किरात** | कृष्णाजी लक्ष्मण सोमण |
| **कुवलयानंद** | जगन्नाथ गणेश गुणे |
| **कृष्णतनय** | विनायक कृष्ण मुळे |
| **कृष्णाग्रज** | बळवंत महादेव गा |
| **केशवकुमार** | प्रल्हाद केशव अत्रे |
| **केशवसुत** | कृष्णाजी केशव दामले |
| **गिरीश** | यशवंत केशव कानेटकर |
| **गोपिकातनया** | सौ. मनोरमाबाई रानडे |
| **गोविंदाग्रज** | राम गणेश गडकरी |
| **चंद्रशेखर** | चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे |
| **जातिहृदय** | नारायण दामोदर सावरकर |
| **दत्त** | दत्तात्रय कोंडो घाटे |
| **धनुर्धारी** | रामचंद्र वि. टिकेकर |
| **नागेश** | नागेश गणेश नवरे |

| | |
|---|---|
| नाथमाधव | नाथ माधव पितळे |
| बलवंत | बलवंत हणमंत पळशीकर |
| बालकराम | राम गणेश गडकरी |
| बालकवी | त्र्यंबक बापूजी ठोमरे |
| बी | नारायण मुरलीधर गुप्ते |
| भालचंद्र | गणेश नारायण टिपणीस |
| भृंग | काशिनाथ वा पंडित |
| मधुप | कृष्णाजी केशव गोखले |
| मनोहर | गोपाळ गंगाधर पोतदार |
| मार्गण | सीताराम केशव दामले |
| माधवानुज | काशिनाथ हरि मोडक |
| महाराष्ट्रीय | नारायण रामचंद्र पाटणकर |
| मुकुंदराय | मुकुंद गणेश मिरजकर |
| यशवंत | यशवंत दिनकर पेंढारकर |
| राधारमण | कृष्णाजी पांडुरंग लिमये |
| लोकहितवादी | गोपाळ हरि देशमुख |
| वनमाळी | वासुदेव गोविंद मायदेव |
| विनायक | विनायक जनार्दन करंदीकर |
| शारदाभक्त | कृष्णाजी बाबाजी कुळकर्णी |
| शारदाश्रमवासि | पुरुषोत्तम गोविंद काणेकर |
| श्रीकृष्ण | श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर |
| सदाशिवात्मज | परशुराम सदाशिव देसाई |
| सहकारी कृष्ण | कृष्णाजी अनंत एकबोटे |
| साधुदास | गोपाळ गोविंद पाटणकर |
| सीतकांत | सीताराम शिवराम लोटलीकर |
| सुमंत | धुंडिराज आप्पाजी मुर्तुले |